# प्रार्थना : एक अनाकलन

— प्रकाश नार्वेकर

अध्यात्मिक पातळीवर काव्यलेखन करणाऱ्या ज्या समर्थ काव्यपरंपरा जगात अस्तित्वात आहेत त्यामध्ये मराठीचा क्रमांक पहिल्या पाचात सहज लागेल. मुरव्या अध्यात्मिकतेपेक्षा भारतीयांची अध्यात्मिक परंपरा ही निःसंशय श्रेष्ठ आहे. डांटेपेक्षा आपले तुकाराम, ज्ञानेश्वर केव्हाही श्रेष्ठ होत. अशा ह्या समर्थ मराठी परंपरेत केशवसुतांपासून भुरटी आणि उथळ अध्यात्मिकता आणि गूढता जपणारे अडाणी कवी जन्मले आणि मराठी कवितेचा अक्षरशः सत्यानाश झाला ह्या मुरव्या अध्यात्मिक कवींचा अडाणीपणा तीन पातळ्यावर होता.

ज्या ब्रिटीश रोमॅण्टीसिझमामधून हे कवी प्रेरणा घेत होते तो ब्रिटीश रोमॅण्टीसिझम का जन्मला ? ह्याविषयी ह्यांना घोर अज्ञान होते. न्यूटनचा यंत्रवादी कार्टेशियन संदर्भ चौकटीविरुद्ध उठाव आणि रुसो, कान्ट, स्पिनोझा आणि फिश्त यांची तत्वज्ञाने यांच्या पार्श्वभूमीवर रोमॅण्टीसिझम उभा राहिला होता. केशवसुत वगैरेंना ह्या पार्श्वभूमीची कवडीचीही माहिती नव्हती.

ज्या ख्रिश्चन तत्वज्ञानाची, श्रद्धेची व परंपरेची मूळे पाश्चात्य कवितेत होती त्याविषयी हे लोक अनभिज्ञ होते.

ह्यातील एकालाही तुकाराम ज्ञानेश्वरांची अध्यात्मिकता नीट पचली नव्हती किंबहुना तिचा स्पर्श तरी झाला होता का ? ह्याची शंका यावी इतके हे लोक ह्या अध्यात्मिक तळमळीपासून दूर होते.

अशा कवींनी मग पुस्तकी कविता लिहिल्या तर आश्चर्य ते काय ? ह्यांचा आणि गूढवादाचा संबंध हा केवळ कविता लिहिण्यापुरता होता. मराठीत अशा मुरव्या अध्यात्मिक गूढ कविता लिहिण्याची परंपरा नंतर आरती प्रभू आणि ग्रेस यांनी समर्थपणे चालवली. प्रत्यक्ष अस्तित्वावर कविता उभी करण्याऐवजी केवळ कल्पनाविलासावर ह्यांनी कविता उभी केली. दोघांची प्रतिमा जबरदस्त असल्याने यांनी अक्षरशः गेली तीन दशके मराठी रसिकांना व समीक्षकांना गुंगवून ठेवले. मराठीतल्या एकाही समीक्षकाला ह्यांच्या अध्यात्मिकतेतला फोफसेपणा जाणवला नाही इतकी ही गुंगी जबरदस्त होती. ह्यांच्या कवितेचा खरोखरच अध्यात्मिकतेशी संबंध आहे का की मांत्रिक जसे केवळ मंत्राच्या नादावर व मारण्याच्या ताकदीवर नसलेली भूते असलेली दाखवतो तसे हे कवी शब्दांचे खेळ करून आपणाला मारावून टाकत आहेत, ह्याची आता चौकशी करण्याची वेळ आला आहे असे मला वाटते. ह्या दृष्टिने प्रार्थना ही कविवर्य ग्रेस यांची कविता तपासून पाहू

'या इथे' ह्या दोन शब्दापासून कवी सुरवात करतो. ह्या दोन शब्दांनी अवकाशाची ठाण निश्चित होते आणि आपण या इथे आता काय घडणार म्हणून कविता वाचत जातो. ह्या अवकाशात झाडे आहेत, संधीप्रकाश आहे. हा संधीप्रकाश झाडांना उदासीन करतो, कविला नाही हे लक्षात घेण्यासारखे आहे. झाडे संधीप्रकाशामुळे कशी उदासीन होतात हा प्रश्न आक्रमक म्हणून सोडून देऊ. ह्या संधीप्रकाशात कवी स्तोत्रे म्हणतो तीही ईश्वरी करूणांची. ह्या कवितेतला काळ संध्याकाळचा आहे (संध्याकाळच्या कविता हा संग्रह वाचून कवी फक्त संध्याकाळीच पार्टटाईम अध्यात्मिक होतो की काय अशी शंका येते) अशावेळी मावळतीला किरण समुद्राच्या पाण्यात

बुडून जातात. कवी किरणांना शेवटची फुले म्हणतो. इथे प्रश्न पडतो समुद्राचे पाणी दिशाहीन कसे ? की कविता विशेषणमधुर करण्याचा हा हव्यास ? नदीचे पाणी दिशाहीन असू शकते कारण त्याला प्रवाह असतो. समुद्राचे 'दिशाहीन' पाणी स्वीकारणे जडच जाते. त्यानंतर क्षीतिजाचे अमूर्त बन येते. आता बन अमूर्त असेल तर तिथे वणवे कसे पेटतील ? उत्कर्षाने हे वणवे पेटतात त्यामुळे तर अमूर्त हे विशेषण अधिकच हास्यास्पद होते आणि हे सारे कवी ईश्वरी करूणांची स्तोत्रे म्हणत असताना होते. कवीच्या स्तोत्रांचा आणि घटनांचा कसलाही अध्यात्मिक संबंध प्रस्थापित न होता कवितेचा पहिला खंड संपतो.

दुसऱ्या खंडात अवकाश तोच आहे आणि इथून कवीच्या अस्तित्वाचे पाय जमिनीवरून पूर्ण सुटतात आणि केवळ कल्पना चमत्कृतीचा खेळ सुरू होतो. शिल्प-गांधार हा एक अडाणी जोडशब्द. इथे शिल्पाचा गांधार म्हणजे गांधार सूर की गांधार पद्धतीचे शिल्प हे स्पष्ट होत नाही आणि ह्या तथाकथित शिल्पगांधाराच्या शून्य नगरीत कवी पोहचतो ही नगरी अस्तित्वाशी कसलेही नाते सांगत नाही. वासना अंतिम कधीच नसतात तेव्हा प्रार्थना अंतिम असणार म्हणजेच रचना वासनांच्या अंतिम प्रार्थना अशी असणार आणि कवी त्या म्हणू लागतो. ह्या प्रार्थनांना साक्ष कुणाची तर आत्मलीन पाचोळ्याची. आता समुद्रकिनाऱ्यावर असा पाचोळा किती असतो हा प्रश्न विचारायचा नाही. पहिल्या कडव्यात झाडे उदासीन होतात. इथे पाचोळा आत्मलीन होता आणि कवीचा मात्र काहीच संबंध नसतो. कवी उदासीन नाही की आत्मलीन नाही. तो बिचारा स्तोत्रे म्हणतो किंवा प्रार्थना म्हणतो. ह्या स्तोत्रात तुकारामाचा आकांत नाही की ज्ञानेश्वरांची भावप्रवणता नाही आहे तो केवळ कल्पनाविलास साहजिकच लोचनातील दुःखे अतर्क्य बनतात (म्हणजे काय ते आपण विचारायचे नाही कारण 'अतर्क्य' असे उत्तर कवीने ऑलरेडी देऊन ठेवले आहे) ह्या दुःखातून चन्द्रकालीन शिवालयांची बर्फाच्छादित शिखरे (ही महाराष्ट्राच्या कुठल्या समुद्रकिनाऱ्यावर आढळतात हे जरा शोधायला हवे.) प्रार्थनांच्या अंधारात शिरत असतात. आता ज्यांची आध्यात्मिकताच फोफशी आहे त्यांच्या प्रार्थनात अंधार असेल नाहीतर काय असेल. चन्द्रकालीन शिवालये म्हणजे काय ? शिवालयांची शिखरे बर्फाच्छादित फक्त हिमालयात असू शकतील ती समुद्रकिनाऱ्यावर कशी उगवली ? चन्द्रकालीन ह्याचा अर्थ रात्री असाच घ्यायला हवा कारण तोच चन्द्राचा काळ असतो. आता शिवालये फक्त रात्रीच अस्तित्वात असतात असे कवीला म्हणायचे आहे काय ? जिला उद्देशून म्हटलंय ती तू प्रेयसीच असणार कारण परमेश्वराच्या लोचनातून अतर्क्य दुःखे झरणे शक्य नाही. आता ही जर तू असेल तर आधीच्या अध्यात्मिक बडबडीचे काय ? ह्या कवितातून तरीही पिळून पिळून आपले समीक्षक सनातन वगैरे अर्थ शोधून काढत असतात. अशी सजवून सजवून मांडलेली अध्यात्मिकता काय कामाची ? मृत्यूचा काडीचाही अनुभव नसताना सजवून सजवून तो कशाला मांडायचा ? अध्यात्म ही इथली आणि इथलीच बाब असते. मोक्ष म्हणजे तथाकथित सररिॲलीस्टीक अनुभवन नाही. मोक्ष म्हणजे अवघ्या विश्वाशी अतिशय शुद्ध आणि मोकळे नाते प्रस्थापित करणे. कबीराने ह्या संदर्भात पंडीतांची उडवलेली टवाळी सर्वश्रुत आहे. महाराष्ट्रात सजवून अध्यात्म मांडणाऱ्या पंडीतांची एक मोठी परंपरा होऊन गेली. चि. त्र्य. खानोलकर (आरती प्रभू) आणि ग्रेस हे ह्या पंडीताचे आधुनिक अवतार आपल्या अडाणी समीक्षकांनी ह्या पंडीतांना डोक्यावर घेतले आणि हे महान कवी झाले. आज अनेक तरूण कवी ह्या कवींच्या खोट्या फोफश्या रोमॅण्टिक अध्यात्मिकतेला आणि गूढतेला फशी पडून बोबड्या अध्यात्मिक कविता लिहित असतात. ह्या तरूण कवींना माझा एकच सल्ला. 'बाबांनो जरा ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम नीट वाचा, पचवा आणि मग पहा तुमच्या समोरचे हे तथाकथित आत्मलीन पाचोळे आपोआप उडून जातील.'

❀ ❀ ❀

# टिकाहरण

## प्रकरण पहिले

— श्रीधर तिळवे

मराठीत ज्या मोजक्याच साहित्यिक चळवळी विसाव्या शतकात झाल्या त्यातील देशीवादाची चळवळ ही एक अतिशय महत्वाची चळवळ होय किंबहुना मराठी साहित्याला उपकारक अशी दुसरी कुठली चळवळ मराठी भूमीत आधुनिक काळात झाल्याचे मला तरी स्मरत नाही. वारकरी महानुभव चळवळीनंतरची ही दुसरी महत्वाची चळवळ मानायला हरकत नाही. मराठीचा कुठलाही सुजाण वाचक या चळवळीच्या ऋणात राहील. मात्र एखादी गोष्ट आपल्याला कायमची ऋणी करून ठेवते ह्याचा अर्थ ती कायमपणे बरोबरच असेल असे मात्र नाही. आयुष्य हे इतके गतिमान असते की ते सर्वच नव्या गोष्टी थोड्याच कालावधीत जुनाट करून टाकत असते. ह्या चळवळीची नव्या संदर्भात तपासणी करणे त्याचमुळे आवश्यक वाटते.

मराठीत ह्या चळवळीचे श्रेय कुणा एकाला देणे अवघड वाटते. मात्र एकंदरीत दिलीप चित्रे, चंद्रकांत पाटील आणि भालचंद्र नेमाडे ह्यांची नावे ह्या संदर्भात प्रामुख्याने घेतली जातात ह्यातील दिलीप चित्रे यांना सत्यकथेचे आंतरराष्ट्रीय वारे थोडेफार लागल्याने त्यांची सुरुवातीची भूमिका देशी आहे का ? ह्याची शंका वाटते. पुन्हा तुकाराममध्ये मात्र ते पूर्णपणे देशीवादाच्या घरात आलेले दिसतात. अन्यथा त्यांच्या सुरुवातीच्या कालखंडात त्यांची समीक्षा देशीवादाच्या अंगणात नाचत असलेली दिसते. त्यांच्या भूमिकेला आत्मनिष्ठ देशीवाद म्हणता येईल. कदाचित दिलीप चित्रे हे प्रामुख्याने कवी असल्याने व नेमाडे हे प्रामुख्याने कादंबरीकार असल्याने दोघांच्या भूमिकेत आत्मनिष्ठ आणि वास्तुनिष्ठ असा फरक पडला असावा. अनेकदा समीक्षक कुठला वाङ्मयप्रकार कलावंत म्हणून हाताळतो ह्यावर त्याची समीक्षात्मक भूमिका अवलंबून असते. भालचंद्र नेमाडे हे बऱ्यापैकी कवी असल्याने (ते कादंबरीकार म्हणून थोर आहेत) पु. शि. रेगेंच्याबाबत त्यांची भूमिका दुभंगलेली आढळते. चंद्रकांत पाटील हे वर्तमानपत्री कवी असल्याने (ह्याला "निःसंदर्भ" काहीसा अपवाद) त्यांची समीक्षाही वर्तमानपत्री झालेली आढळते. त्यातच सत्यकथेचे समीक्षक इंग्रजीत फेऱ्या मारून मराठीतून आंतरराष्ट्रीय समीक्षा लिहायचे तसे हे गृहस्थ हिन्दीत फेऱ्या मारून आणि इंग्रजीत चकरा टाकून समीक्षा लिहित असल्याने त्यांची भूमिका ही मराठीपेक्षा हिन्दीशीच जास्त निगडीत झालेली आहे. हिन्दीत गजानन मुक्तीबोध नावाच्या कवीने जी समीक्षा केली तिचा एक अस्पष्ट प्रभाव त्यांच्या समीक्षेवर जाणवतो. भालचंद्र नेमाडे मात्र आरंभापासून अंतापर्यंत देशी समीक्षक म्हणून वावरताना दिसतात. देशीवादाची भूमिका अतिशय प्रभावीपणे त्यांनी मांडल्याने त्यांच्याभोवती एक 'कल्ट'वादी वलय तयार झालेले स्पष्टच दिसते आहे. त्यातच आमच्या आधीचे पिढीतील रंगनाथ पठारे ते राजन गवस वगैरे कादंबरीकार नेमाडेंच्या देशी परंपरेचा अतिशय समर्थपणे आपल्या सृजनशील लेखनात विस्तार करत असल्याने त्यांचा सर्व खटाटोप यशस्वी होऊ लागलाय असे दिसते. किंबहुना त्यांचा हा विस्तार यशस्वी होणे मलाही मराठीच्या विकासाच्या संदर्भात अतिशय आवश्यक वाटतो किंबहुना आमच्या आधीच्या पिढीची ती जबाबदारीच आहे.

मराठी समीक्षेच्या इतिहासात २२ ऑगस्ट १९८० ते २५ ऑगस्ट १९८० हे तीन दिवस फार महत्वाचे आहेत. कारण ह्याच दिवशी पॉप्युलर प्रकाशनाचे मालक श्री. रामदास भटकळ आणि शिवाजी विद्यापीठ यांनी एकत्र येऊन

कोल्हापूरात एक मराठी साहित्यावर खुले चर्चासत्र आयोजित केले. ह्या चर्चासत्रात भालचंद्र नेमाडे यांनी अतिशय प्रभावीपणे देशीवादाचे समर्थन करून कोसला व चित्रे, कोलटकरांच्या कविता यांच्यापासून सुरू झालेली देशीवादाची घोडदौड निर्विवादपणे अश्वमेध यज्ञानंतरच्या साफल्यापर्यंत न्हेली. विद्याधर पुंडलिकांचा थोडासा अपवाद करता नेमाडेंशी दोन हात करणे कुणाला जमले नाही आणि हातकणंगलेकरासारखे समीक्षकही देशीवादाकडे वळले त्यामुळे १९८० नंतर महाराष्ट्रातील अनेक नव्या सृजनशील उर्मी स्वखुशीने देशीवादाच्या राज्यात सामील झाल्या. ह्यानंतरचे सत्यकथेचे बंद पडणे हा योगायोग नव्हता. किरण नगरकरांची 'सात सकं त्रेचाळीस' ह्य सत्यकथेने दिलेला शेवटचा ताकदीचा हुंकार होता. (ह्या कादंबरीत अस्तित्वाच्या काव्यात्मक अंगाचे पडसाद चांगले उमटले पण सत्यकथेचे रोमॅण्टिक धुके वाजवीपेक्षा जास्त झाल्याने 'आशय स्पष्ट दिसणे' अधूनमधून बंद झाले मात्र चौथ्या परंपरेच्या संदर्भात ही कादंबरी कोसलाइतकी नसली तरी बरीच महत्वाची आहे ह्याविषयी शंका नाही) ह्यापूर्वीच आनंद यादवांनी सत्यकथेतून देशी उडी घेऊन ग्रामीण साहित्याची चळवळ उभी केली होती. दलित चळवळीने आपले पाय आधीच फैलावले होते. ह्या सगळ्या पार्श्वभूमीवर देशीवादाची संपूर्ण चिकित्सा होणे आता आवश्यक वाटते. मराठीतील देशीवादाची चिकित्सा भालचंद्र नेमाडे यांच्या समीक्षात्मक लिखाणातून सुरू होते व सध्या तरी तिथेच संपते. दिलीप चित्रेंची समीक्षा ज्या दिवशी पूर्ण संकलनाच्या स्वरूपात सामोरी येईल तेव्हा तिचा विचार करता येईल. इथे नेमाडेंच्या 'टीकास्वयंवर' ह्या पुस्तकातील देशीवादाची चिकित्सा केली आहे.

भालचंद्र नेमाडे यांच्या भूमिकेतला सर्वात मोठा विरोधाभास कोणता असेल तर तो म्हणजे ज्या देशीवादाचे समर्थन ते करतात तो देशीवाद मूळात देशी नाही. मराठीतील सर्वच विचारांप्रमाणे हा विचारही परदेशातून आयात केलेला आहे. भारतीयांच्याकडे एकमेव देशी गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे 'आळस' ! (हे मी विनोदाने लिहितोय) त्यामुळे स्वतंत्र विचारसरणी तीही आपल्या आयुष्याच्या संदर्भात करणे अध्यात्मिक पुढारी वगळता इतरांना शक्य होत नाही. अध्यात्मिक पुढारी मात्र नेहमीच इथल्या मातीशी निगडीत राहिले आणि त्यांनी देशाऐवजी नेहमीच संपूर्ण विश्वासाठी पसायदान मागितलेले दिसते. माझ्या भूमिकेचे नाते त्यांच्याशी निगडीत आहे हे मी प्रथमच स्पष्ट करतो. नेमाडेंच्या देशीवादावर पडलेला आणि पडायला हवा होता अश्या दोन्ही प्रकारच्या विदेशी प्रभावाची स्थूल चर्चा ज्ञानदा ठाकूर यांनी परिशिष्टातील निबंधात केली आहे. माझे इंग्रजी वाचन तोकडे असल्याने मी ह्या संदर्भात चर्चा वा भाष्य करणे अप्रस्तुत व मर्यादाभंग करणारे होईल. नेमाडेंनी वृक्ष ह्या संकल्पनेचा वापर करून (जो त्यांच्या क्षत्रीय जाणीवेला साजेसा आहे) त्यांची भूमिका मांडल्याने प्रथम आपण त्याचा विचार करू व नंतर जातिव्यवस्था ह्या देशीयतेच्या मुख्य आधाराकडे वळू.

विवेचनाला सुरवात करताना आपणखी दोन गोष्टी इथे सांगाव्याशा वाटतात. पहिली गोष्ट मराठीतील येऊ घातलेल्या पोरांसाठीच आहे. (माझे सर्व समीक्षात्मक लिखाण त्यांच्यासाठीच असते. भारतातील म्हाताऱ्या विचारवंतांचा मेंदू वयोमानाप्रमाणे आपोआपच गुडघ्यापर्यंत सरकत सरकत येतो त्यामुळे त्यांना काही सांगण्यात अर्थ असतो असे वाटत नाही अर्थात काही सन्माननीय अपवाद आहेतच.) नेमाडे, चित्रे, पाटील प्रभुतींनी जो देशीवादाचा शोध घेतला तो काहीसा उलटा होता. हे देशीवादी फांद्यातून मुळाकडे आले. **नेमाडेंनी म्हटल्याप्रमाणे त्यांच्या पिढीने कधीच सुरवातीला युरोपचा व्यास कोण हा प्रश्न विचारला नाही तर भारताचा शेक्सपिअर कोण हा प्रश्न विचारला** (पहा प्रतिष्ठानचा मे, जून १९९३ चा अंक) त्यामुळे सुरवातीला ह्या लोकांनी आपल्या अस्तित्ववृक्षाच्या फांद्याच

पकडल्या. ह्या फांद्यावर तोलकळताना जे असह्य ताण निर्माण झाले त्यातून ह्यांनी स्वतःला नीट उभे करण्यासाठी मूळाकडे धाव घेतली आणि त्यानंतर **स्वतःची मूळे प्रथम घट्ट करा आणि मग तुमच्या फांद्या हव्या तेवढ्या विश्वभर न्ह्या अशी भूमिका नेमाडे मांडू लागले.** ('मराठी साहित्य प्रेरणा आणि स्वरूप' ह्या ग्रंथातील पान क्र. ७४ वर त्यांनी ही भूमिका मांडली आहे) ह्या कल्पनेत साहित्यिक हा वृक्षासारखा असून त्याची मूळे परंपरेत रूजलेली असावीत आणि मग त्याने आपल्या फांद्या विश्वभर न्याव्यात असे अध्याहृत आहे.

नेमाडे यांच्या ह्या वृक्ष संकल्पनेत अनेक गफलती आहेत. पहिली गफलत म्हणजे हा वृक्ष सांस्कृतिक अर्थाने विदेशी आहे. त्यात मूळ केवळ खोल खोल जाते आणि फांद्या आकाशात वाढत जातात असे गृहीत धरलंय. नेमाडेंच्या दुर्दैवाने भारतीय वृक्षाची सांस्कृतिक संकल्पना वटवृक्ष (वड) आहे आणि मानवी अस्तित्वाच्या संदर्भात ती अधिक सार्थक आहे. वडाची मूळे केवळ खोल झिरपत नाहीत तर पुन्हा वरच्या शाखांना पारंब्या फुटून खाली येतात आणि रूजतात तेव्हा मूळ आणि फांद्या ही संकल्पना तितकीशी खरी नाही. मूळ, झाड, शाखा शाखातून पुन्हा शाखा, प्रशाखा असाच अस्तित्वाचा प्रवास असतो. तेव्हा अस्तित्वाने आपली मूळे केवळ आपल्या परंपरेतच रूजवावी हा आग्रह चुकीचा आहे. अस्तित्वाने आपली मूळे केवळ देशीच नव्हे तर इतर विदेशी परंपरातही सखोल न्ह्यावीत आणि नित्य नव्याने शाखा प्रशाखा वाढवत न्याव्यात. महाराष्ट्र देशी असावे हा चक्रधरांचा उपदेश चित्रे आणि नेमाडे यांनी प्रमाण मानलाय, पण तो पूर्ण चुकीचा आहे त्यामुळे चक्रधर महाराष्ट्रापलिकडे मजल मारू शकले नाहीतच उलट महाराष्ट्रातही त्यांच्या पंथाचा ऱ्हासच झाला शेवटी वाढ ही अवकाश सतत रूंदावत न्हेणारी प्रक्रिया आहे तिलाच तुम्ही देशाच्या मर्यादा घालाल तर संपाल. चक्रधरांनी ती घातली, चक्रधर संपले. ज्ञानेश्वरांनी विश्वासाठी पसायदान मागितले, ते वाढत राहिले आणि शेवटी तुकोबाच्या रुपाने आकाशाला भिडले. नेमाडेंनी कोसलात देशीयता नावाची मानगड येऊ दिली नाही कोसला वाढत राहिली. बिढार, जरीला, झूल मध्ये देशी झाले आणि सगळी ग्रेस गमावून बसले. चित्रेंनाही आवडणारा ऑक्टोव्हिया पॉझ 'इस्ट स्लोप'मध्ये आशियाई परंपरात मूळे न्हायला धडपडला परिणामी उत्कृष्ट नाही तरी उत्तम कविता लिहू शकला ह्याउलट दिलीप चित्रे 'बर्फाच्या दिवसात'मध्ये महाराष्ट्र देशी बसल्याने कळत नकळत तिथल्या परंपरांच्या मूळांना पारखे झाले आणि फांद्याफांद्यावरच उड्या मारत राहिले. (विशेषतः रशियावरील कविता) तेव्हा आपली मूळे केवळ आपल्या देशी परंपरेतच रूजवावी हे म्हणणे तितकेसे खरे नाही.

नेमाडेंची ह्याच वृक्ष संकल्पनेतली दुसरी गफलत म्हणजे प्रथम मूळे नंतर फांद्या असा अनुक्रम. प्रत्यक्ष मानवी अस्तित्वाबाबत अनेकदा नेमकी उलट प्रक्रिया दिसते. बीजामध्ये केवळ मूळाच्या शक्यता कधीच नसतात. त्यात शाखा फुले-पाने यांच्याही शक्यता सुप्तपणे असतात. त्यामुळे मानवी अस्तित्वाबाबत अनेकदा घडते असे की फांद्या अधिक वाढू लागल्या की संपूर्ण वृक्षाचा तोल आणि संभार सांभाळण्यासाठी अस्तित्वाची मूळे अधिक खोल न्ह्यावी लागतात. त्यामुळेच मानवाने आणि कलावंताने आपल्या फांद्या जगभर न्ह्याव्यात आणि त्यातून पुन्हा आपली मूळे दुसऱ्या परंपरातही रूजवावीत. नेमाडे आणि चित्रे यांना देशीयतेचा लागलेला शोध हा त्यांच्या आंतरराष्ट्रीय विस्तारामुळे लागलेला शोध आहे. माणूस जितका आंतरराष्ट्रीय तितका अधिक देशी असतो. माणसाला वैश्विक लिहिण्यासाठी अधिकाधिक खाजगी व्हावं लागतं. दुर्दैवाने मराठीत खाजगी संवेदनशीलता लपवून खोटं खोटं रोमॅण्टिक आणि सामाजिक लिहिण्याची परंपराच फोफावल्याने मराठी साहित्य वैश्विकतेला पारखे झालेले दिसते उदा. जातीयतेचा अनुभव प्रत्येकाला येतो, आला. पण त्याविषयी साहित्यात

मात्र कुणी लिहिलं नाही. ह्याउलट दलितांनी खाजगी आत्मचरित्र लिहिण्यास सुरुवात करताच जातीव्यवस्थेचे सर्वंकष स्वरूप समोर आले. भारतातील रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, गांधी, आंबेडकर हे महापुरुष अधिक आंतरराष्ट्रीय होते म्हणूनच अधिक देशी झाले, त्याउलट लो. टिळक आणि सावरकर हे देशीवादी असल्याने सर्वात कमी देशी झाले (सावरकरांचा ह्याबाबतीतला अहंकार इतका मोठा होता की सावरकरांना एकदा त्यांच्या अनुयायाने "तुम्ही मार्क्स वाचला होता का ? असे विचारले असता सावरकरांनी त्याला उत्तर म्हणून प्रतिप्रश्न केला. "मार्क्सने सावरकर वाचला होता का ?") ह्यातील कळीचा मुद्दा असा की, तुम्हाला अस्सल देशी होण्यासाठीही आंतरराष्ट्रीय असावे लागते. अमेरिकेतील भारतीय माणसाला स्वतःचा Indianness जेवढा जाणवेल तेवढा भारतातल्या भारतीयाला जाणवणार नाही कारण तुलना करण्यासाठी मुळातच त्याच्यासमोर दुसरी संस्कृती नाही.

नेमाडेंच्या ह्या वृक्ष संकल्पनेतील तिसरी गफलत म्हणजे मुळाचा विकास हा फक्त मर्यादित देशातच होतो हे त्यांचे गृहीतक प्रत्यक्षात माणसाचे अस्तित्व ही एक अनंत शक्यता असलेली बीजस्थिती आहे. त्यामुळेच एखाद्याची मूळे केवळ देशातच नव्हे तर परदेशापर्यंत भिडतात आणि ती तशी विस्तारतच राहतात. माणसाचे अस्तित्वमान हे केवळ देशी परंपरेतूनच नव्हे तर आंतरराष्ट्रीय परंपरांच्या समावेशन आणि समायोजनातूनही विकसीत होत असते. माणसाचा अस्तित्ववृक्ष हा आकाशात फांद्याने वाढत जातो तसेच मातीखालीही मूळाने पसरत पसरत जातो.

नेमाडेंची चौथी गफलत म्हणजे त्यांचा 'कलमी' प्रक्रियेवर असलेला अविश्वास माणूस हे एक झाड मानले तर त्यांच्यावर इतर अनेक परंपरांची झाडे कलम करता येतात आणि त्याचा त्या कलमाला आणि झाडाला दोघांनाही फायदा होऊ शकतो. उदाहरणार्थ भारतीय संस्कृतीवर पाश्चात्य विज्ञानविद्येचे झालेले कलम. नेमाडेंना कलमी व्यवस्था लक्षात घ्यावीशी वाटत नाही. कारण त्यांची वृक्षाविषयीची संकल्पना ही क्षत्रिय आहे. वैश्य जाणिवेत वृक्षाकडे बघण्याचा दृष्टिकोनच बदलला आहे.

नेमाडेंची ही वृक्षसंकल्पना एका अर्थाने आधारशिला असल्याने तिचा ऊहापोह केला. नेमाडेंच्या दुसऱ्या गोष्टींचा विचार आता करू.

नेमाडेंची सर्व समीक्षा पाहिली तर त्यांनी एक स्टान्स घेतलाय हे सतत जाणवते. नेमाडेंच्या ह्या भूमिकेत सतत सार्त्रच्या अस्तित्ववादी कृतीचा स्टान्स जाणवत राहतो त्यांचा हा स्टान्स देशी नाही एवढे इथे नमूद करावेसे वाटते. नेमाडे हे मराठीतील साहित्याच्या रंगभूमीवर नेमका काय रोल करायचा आहे याची पूर्ण कल्पना असलेले पहिले समीक्षक आहेत. आपल्याकडील बहुतेक समीक्षकांचा कुठल्या मूल्यावर ठाम विश्वास नसतो त्यामुळे ह्यांची समीक्षा म्हणजे केवळ ॲकॅडेमिक जोर बैठकांची व्यायामशाळा बनते. उदारमतवादाच्या गोंडस नावाखाली कसलीही मूल्ये नसलेली समीक्षा हे लोक लिहितात. उदारमतवादाचा अर्थ इतरांच्या सर्व मताविषयी उदार असणे, आदर बाळगणे हा आहे. ह्या भूमिकेत माझी भूमिका ठाम आहे, तशी तुझी भूमिका ठाम आहे. पण मी तरीही तुझ्या भूमिकेला मान देतो हे अभिप्रेत आहे. आपल्याकडील समीक्षकांनी मात्र ह्याचा अर्थ "माझी भूमिका, सर्व समीक्षा सर्व मतांना खुली" असा केला आहे. त्यामुळे एकाच समीक्षकाच्या समीक्षेत रसविचारापासून आदिबंधात्मक, अस्तित्ववादी विचारापर्यंत सर्व विचार सुखनैव नांदतात आणि ह्या विचारात त्या समीक्षकाचा स्वतःचा असा काही विचार दिसत नाही. नेमाडेंच्या स्टान्समध्ये असा लेचेपेचेपणा दिसत नाही. त्यांच्या समीक्षेचा हा एक महत्वाचा गुण मानायला

हरकत नाही.

माझा स्वतःचा स्टान्स हा थोडासा वेगळा आहे. मला वाटतं परिवर्तनाचा वैश्विक स्टान्स (जो देशीही आहे) हा गौतम बुद्धाने स्वतःच्या उदाहरणानेच सिद्ध केलाय. आणि हा स्टान्स सार्त्रपेक्षा अधिक थोर व प्रगल्भ आहे. कारण तत्वज्ञानापेक्षा करूणा ही अधिक उंचीची गोष्ट आहे असे मला वाटते. हजार कवितांपेक्षा प्रेम आणि समग्र मनापेक्षा (ज्याला बुद्ध आत्मा म्हणतो) महानिर्वाण ही अधिक मूल्यवान गोष्ट आहे असे मला वाटते. माझा स्वतःचा स्टान्स हा बुद्धाचा करूणावाद, भांडवली अर्थव्यवस्था प्रमाण मानणारा वैज्ञानिक, भांडवलशाहीवाद, चातुर्वण्य नाकारणारा औपनिषदिक आनंदवाद (वेद, स्मृती आणि चातुर्वण्य मानणारी सर्व ज्या पुराणे व उपनिषद ही सर्व रद्दी आहे असे माझे स्पष्ट मत आहे) ह्या त्रिसूत्रींवर आधारीत आहे. ह्या त्रिसूत्रीवर फुले आंबेडकरांचा प्रभाव पडणे अटळ आहे. मात्र बाबासाहेबांचा समाजवादाचा पुरस्कार मला मान्य नाही. मी माझ्या भांडवलविषयक दृष्टीला 'आनंदवादी भांडवलशाही मानतो आणि हा आनंद घेण्याचा अधिकार जितका मानवाला आहे तितकाच मानवेतरांना आहे हे मान्य करतो व वृक्षवल्ली आम्हा सोयरी मानणाऱ्या तुकोबाच्या आनंदवादी पर्यावरणवादी दृष्टीकोनाला स्वतःची दृष्टि जोडून घेतो. भांडवलशाहीतील तृष्णेचे (हा शब्द मी बुद्धाच्या अर्थाने वापरतो) नियंत्रण केले नाही तर काय होते हे पर्यावरण नष्ट करायला निघालेल्या बुद्धू लोकांनी उघडपणे दाखवून दिले आहे तेव्हा तरूण मराठी साहित्यकांनी मार्क्सवादाला विरोध करताना मुक्त अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करताना पर्यावरणाबाबत भारताचा हजारो वर्षे चालत आलेला समायोजनाचा सुबुद्ध दृष्टिकोन साहित्यात प्रकट करणे गरजेचे वाटते. जगाला आज त्याची गरज आहे.

नेमाडेंची समीक्षा ही मुख्यतः समाजशास्त्रीय व मानवशास्त्रीय आहे. तेव्हा तिच्या संदर्भात विचार करताना मला माझा समाजविषयाचा दृष्टिकोन थोडक्यात मांडणे आवश्यक वाटते. हा दृष्टिकोन समाजशास्त्रज्ञाचा नसून कलावंताचा कुणालाही जाणवेल असा आहे. जातीव्यवस्था व देशव्यवस्था हा नेमाडेंच्या देशीयतेचा मुख्य आधार आहे. त्यांचा विचार करतानाही समाजाचा, इथला जातीयतेचाही विचार करावाच लागतो. प्रथम आपण समाजाचा विचार करू व त्यानंतर जातीव्यवस्थेकडे वळू.

समाज म्हणजे मानव, मानवी संघटना व समूह यांच्यातील ब्राह्मण जाणीव, क्षत्रिय जाणीव, वैश्य जाणीव आणि दलित जाणीव ह्या चार जाणिवातील परस्पर संघर्षाचा, ताण्याबाण्याचा आणि समायोजनाचा व त्यांनी धारण केलेल्या मूर्तरूपे अमूर्तरूपे यांचा संघात होय. जगातील कुठल्याही समाजात ह्या चार जाणीवा सुप्त, गुप्त आणि प्रकट स्तरावर अस्तित्वात असतात आणि आहेचे वस्तूरूपात वा मनरूपात रूपांतर करत असतात. ह्या स्वतःच मनातून जन्मतात आणि नंतर मनावर स्वार होऊन मनाचेही रूपांतर करू पाहतात. ह्या सर्वच जाणिवांची सखोल चर्चा करणे इथे शक्य नाही फक्त ह्या जाणिवांची वैशिष्ट्ये सांगितली तरी ती इथे पुरेशी आहेत.

## ब्राह्मण जाणीव

### १) धार्मिक :

अ) ईश्वर आहे असे मानते. ईश्वर म्हणजे कोणी चालक शासक असतो तोच ह्या विश्वाची निर्मिती, सांभाळ आणि नाश करतो. हे विश्व ईश्वराचे असते. स्वर्ग आणि नरक अशी मृत्यूनंतरच्या जीवनाची कल्पना असते.

ब) ईश्वरी अवतार किंवा प्रेषित ह्यावर श्रद्धा असते. त्यांची पूजा अर्चा केली असता किंवा त्यांचे अनुकरण केले असता चांगल्या फळाची अपेक्षा असते.

क) ईश्वराने निर्माण केलेल्या मंत्रतंत्रावर किंवा जादूवर विश्वास

असतो किंवा ह्यांची ईश्वर किंवा देवदेवता ह्यांच्याकडूनच निर्मिती झाली असा विश्वास असतो.

ड) ईश्वर आणि मानव यांच्यातल्या मध्यस्थ म्हणून ब्राह्मण काम करत असतो ब्राह्मण हा धार्मिक गुरू व पापाचे विमोचन करणारा असतो, ईश्वर ह्या ब्राह्मणाचे ऐकतो, असा समज असतो.

इ) कलाक्षेत्रात अभिजातवादाचा उदय.

२) राजकीय :

अ) राजा किंवा प्रमुख हा ईश्वराचा अंश - सर्व भूमी ईश्वराची असते.

ब) कायदे धार्मिक वा ईश्वरी असतात किंवा ईश्वर प्रेषिताकडून ते पाठवतो.

क) ब्राम्हण हाच राजाचाही गुरू असतो. धर्माज्ञा त्यालाही मानावी लागते. किंवा राजा हाच धार्मिकतेचा अंश असतो.

३) सामाजिक :

अ) समाज व मानव ईश्वर निर्मित आदिस्त्री व आदिपुरूष यांच्यातून ईश्वरानेच मानववंश निर्माण केल्याचा विश्वास.

ब) ब्राम्हणाचे सामाजिक वर्चस्व त्यांच्या मंत्रतंत्रामुळे घटना घडतात हा विश्वास.

क) ब्राम्हण श्रेष्ठ ब्राम्हण जाणीवही श्रेष्ठ इतर तीन जाणीवा दुय्यम असतात.

ड) कुटुंबसंस्था पूर्णपणे धार्मिक संस्काराखाली. पिता ईश्वराचा अवतार. माता ईश्वरी अवतार.

४) आर्थिक :

अ) कुटुंब, उपजिवीका व जागा ही ईश्वरापुढे मिळालेली व ब्राम्हण जाणिवेद्वारा व प्रत्यक्ष ब्राम्हणांद्वारा नियंत्रीत.

ब) ब्राम्हण जाणिवेत शब्दप्रमाण हेच मुख्य प्रमाण असते आणि आर्थिक संरचना ईश्वरी कायद्यात फिरत राहते.

५) शिक्षण :

अ) ईश्वर विषयक शिक्षण महत्वाचे धार्मिक शिक्षण संस्था महत्वाच्या.

ब) शिक्षण ब्राह्मणवर्गाच्या हातात.

क) शिक्षणावर शब्दप्रमाणाचा प्रभाव.

## क्षत्रिय जाणीव

१) धार्मिक :

अ) ईश्वर आहे. हे विश्व ईश्वरनिर्मित - स्वर्ग नरकावर विश्वास. भूमी राजाच्या वा शासनाच्या मालकीची.

ब) ईश्वरी अवतार वा प्रेषित ह्यावर विश्वास पण हा अवतार ईश्वरातून मानवाकडे येण्याऐवजी मानवाकडून ईश्वराकडे गेला ह्या उन्नयन्नावर अधिक विश्वास.

क) ईश्वरी धर्मग्रंथावर विश्वास.

ड) ईश्वराकडे जाण्यासाठी मध्यस्थ नको - भक्तीवर विश्वास पण कर्मकांडावर अविश्वास. गुरू निवडण्याचे स्वातंत्र्य - ब्राह्मणाऐवजी गुरू महत्वाचा मध्यस्थ म्हणून ब्राह्मणाचे महत्व दुय्यम.

ई) गुरू व विद्वान ज्ञानाची लागवड करणारा शेतकरी होय.

२) राजकीय :

अ) राजा ईश्वरी किंवा असाधारण, शासनाच्या सर्वंकष नियंत्रणाचा विस्तार - राजेशाही किंवा हुकुमशाही - राष्ट्रवादाचा उदय - देशीवादाचा उदय.

ब) कायदा करण्याचा अधिकार राजाला वा राज्याला न्यायाधिश राजाच.

क) राजा हाही गुरू व मार्गदर्शक. राजाज्ञा मोठी.

३) **सामाजिक :**

अ) समाज म्हणजे राजाचा प्रदेशातील मानवी समूह - जमीन हा सामाजिक तत्वांचा मूख्य आधार.

ब) व्यक्ति ही राष्ट्रासाठी भूमीसाठी ह्यातून रोमॅण्टीसिझीमचा उदय.

क) राजाचे वर्चस्व अंतिम शब्द राजाचा.

ड) राजा व जमीनदार श्रेष्ठ - भूमी हीच भांडवल - शेती हेच साधन व साध्य.

ई) राजा हा कुटुंबांचा आदर्श पितृसत्ताक चरमीशिखरावर पिता हा कुटुंबाचा राजा व मुले ही प्रजा ही स्त्री ही प्रजाच.

४) **आर्थिक :**

अ) आर्थिक उत्पादनाची साधने जमीनदाराची सरंजामदाराची पर्यायाने राष्ट्राची म्हणजेच भूमीनिष्ठ.

ब) राजाद्वारे अर्थव्यवस्था नियंत्रीत.

क) धार्मिक अंधश्रद्धांना आव्हान व ब्राह्मणाचे वर्चस्व नष्ट करण्याचा प्रयत्न त्यामुळे आर्थिक तंत्रज्ञानात सुधारणेच्या शक्यता.

ड) राष्ट्रासाठी उत्पादन, भूमी जिंकण्याची स्वप्ने व झगडे.

५) **शैक्षणिक :**

अ) सर्व शिक्षण राष्ट्राला काय उपयोगी आहे. त्याचा विचार करून शिक्षण भूमिकेंद्रित.

ब) शिक्षण धार्मिक पगड्यातून मोकळे.

क) अनुमानात्मक प्रमाणाला महत्व शब्द प्रामाण्याला आव्हान.

## वैश्य जाणीव

ही जाणीव महत्वाची आहे. कारण संपूर्ण विसावे शतक ह्या जाणिवेच्या प्रभावाखाली.

१) **धार्मिक :**

अ) आहे हाच ईश्वर - विश्व ईश्वर नियंत्रीत नाही. मानवकेंद्रित दृष्टिकोन. भूमी व्यक्तिंची.

ब) ईश्वरी अवतार, प्रेषित, किताब ह्यावर श्रद्धा नाही.

क) ईश्वराकडे जाण्यासाठी मध्यस्थ नको. गुरू असलाच तर गौण. शिष्याला महत्व.

ड) गुरू हा स्पिरीच्युअल मॅनेजर त्यामुळेच विद्वान हा ज्ञानाचा व माहितीची मॅनेजर व उत्पादक होय.

२) **राजकीय :**

अ) लोकशाहीचा उदय - लोकांचे राज्य - लोकांवर नियंत्रण मॅनेजरचे.

ब) लोकांची संसद व लोकांचे कायदे - लोकप्रतिनिधी हे मॅनेजर

क) घटनेप्रमाणे राजकीय व्यवस्था घटना हीच मार्गदर्शक - सरकार चालवणे म्हणजे कारखाना चालवणे व मॅनेजमेंट करणे.

३) **सामाजिक :**

अ) सर्व समान व्यक्तीवादाचा घोष विज्ञान तंत्रज्ञान व मानवशाखांचा उदय.

ब) व्यक्ती भूमीसाठी नसून व्यक्तीसाठी भूमी किंवा राष्ट्र वास्तववादाचा उदय.

क) व्यक्तीप्रधान कुटुंबरचना, कुटुंबातही लोकशाही तत्वांचा पुरस्कार त्यामुळे स्त्रीनेही कमवायला हवे ही जाणीव भूमी कुटुंबांची, मालमत्तेची मालकी कुटुंबाची.

ड) मांडवलदार श्रेष्ठ, पैश्यावर श्रेष्ठत्व अवलंबून - मॅनेजर हा सत्ताधारी - शेती व कारखानदारी ही आंतरराष्ट्रीय त्यामुळे शेतीचे बाजारीकरण.

४) आर्थिक :

अ) विज्ञान व तंत्रज्ञानाचे पूर्ण वर्चस्व निसर्ग रुपांतरीत करण्याची अत्याधुनिक साधने.

ब) मांडवलशाही अर्थव्यवस्था बाजार व्यवस्थेचा उदय प्रथम गरजेसाठी वस्तूची निर्मिती नंतर वस्तू खपाव्यात म्हणून गरजांची निर्मिती, स्पर्धेचा पूर्ण स्वीकार.

५) शिक्षण :

अ) व्यक्तिसाठी शिक्षण. गुरू संकल्पनेचा अस्त - कामगार व मॅनेजर तयार करण्यासाठी धडपड.

ब) प्रत्यक्ष प्रमाण हेच प्रमाण, वैज्ञानिक शिक्षणपद्धतीचा उदय - शाळा ही कारखाना विद्यार्थी शिकाऊ कामगार असतो. फॅक्टरीप्रमाणे शाळेचे वेळापत्रक व कामकाज असते.

क) सरकार हा कारखाना तसेच शिक्षण संस्था हाही कारखाना, कारखान्यांचे मॉडेल हे सर्वव्यापी मॉडेल त्यामुळे सर्वच देशात समान कारखानदारी पद्धत व त्याला पूरक समान शिक्षण व्यवस्था क्षत्रियजाणिवेत नैसर्गिक वस्तूंची अधिकाधिक शेती केली जाते, तर वैश्य जाणिवेत कृत्रिम वस्तूंची शेती केली जाते. यंत्र हा एका अर्थाने वैश्य जाणिवेचा नांगरच होय. पृथ्वीतील खनीजे कच्चामाल अंतर्गत भूमी ही जमीन होय.

## दलित जाणीव

१) धार्मिक :

अ) ईश्वर नाही किंवा आहे ह्याविषयी मत नाही अनेकदा नास्तिकतेकडेच कल.

ब) शून्यवादी अध्यात्मिकता किंवा जडवाद वा अस्तित्ववाद.

क) शून्याकडे जायचेच असेल तर स्वतःचा मार्ग स्वतःच निवडायचा गुरुही नको. मध्यस्थही नको आणि शिष्यांचे मी पणही नको.

ड) साहित्यात अतिवास्तववाद, व्यक्तवाद यांचा उदय.

२) राजकीय :

अ) राज्य सर्वांचेच. शासनसंस्थेचा अस्त किंवा स्पर्धाविरहीत लोकशाही.

ब) लोकांचे राज्य. लोकांचे कायदे. घटना हीच शक्ती.

क) राज्य आवश्यक पाप. लोकच कुठल्याही महत्वाच्या प्रश्नावर कॉम्प्युटरमधून मत पाठवतील त्यामुळे प्रत्येक नागरिक संसदेचा सभासद.

ड) सर्वांनाच राज्यसंस्थेत अधिकार.

३) सामाजिक :

अ) सामाजिक स्तरांचा नाश समतेऐवजी सर्वच व्यक्ति मौलिक आहेत आणि प्रत्येक व्यक्तिंची मौलिकता जोपासली पाहिजे हा विचार. थोडक्यात समतेऐवजी मौलिकता.

ब) कुटुंबसंस्थेचा विलय मुले समाजाची प्रत्येक मुलामुलीचे सर्वकजन आईबाप कुटुंबाऐवजी समाजाकडून संगोपन फ्री सेक्स.

४) आर्थिक :

अ) प्रत्येक कार्य मौलिक त्यामुळे सर्वांना कामाच्या तासानुसार वाटा.

ब) सर्व उत्पादन हे यंत्राद्वारेच होईल, कामापासून अधिकाधिक मुक्तता, कामाचे तास कमी कमी होत जातील.

५) शिक्षण :

अ) व्यक्तिंची मौलिकता ओळखून त्यानुसार त्याला शिक्षण देणारी पद्धती.

ब) शिक्षण सर्वांनाच मुक्त व मोफत.

ह्या सर्व जाणिवा मानवी मनात आणि मानवी संस्थात मूर्त आणि अमूर्त रूपात वावरत असतात. ह्यातील कधी चार कधी तीन कधी दोन तर कधी एकच जाणीव एखाद्या घटनेत प्रधान असते. त्यातून जाणिवाचे ब्राद (ब्राम्हण दलित) ब्राक्ष (ब्राम्हण क्षत्रिय) वैब्रा (वैश्य ब्राम्हण) दक्ष (दलित क्षत्रिय) वैद (वैश्य दलित) वैक्ष (वैश्य क्षत्रिय) असे उपप्रकार पाडता येतील त्यांना युग्मजाणीव म्हणता येईल. ह्याशिवाय वैब्राक्ष, ब्राक्षद, वैक्षद, वैब्राद वगैरे असेही उपप्रकार पाडता येईल. त्यांना जाणीवत्रय म्हणता येईल आणि चारही जाणिवा जिथे महत्वाच्या आहेत तिला पूर्ण जाणीव म्हणता येईल.

ह्या जाणिवांच्या प्रकाशात आपण अनेक घटना नीटपणे पाहू शकतो. उदाहरणार्थ नामांतराची घटना ही वैब्रा घटना आहे. एकीकडे आंबेडकरांच्या नावाबाबत शब्दप्रामाण्याचा स्वीकार तर दुसरीकडे ज्या वैश्य जाणिवेतील समता ह्या तत्वासाठी लढत आहेत, त्या लढ्याचे तत्वज्ञान. जगाच्या इतिहासात प्रबोधन काळापर्यंत ब्राक्ष जाणीव प्रभावी दिसते तर नंतर वैद जाणीव प्रभावी ठरलेली दिसते आहे. कार्ल मार्क्स अपयशी ठरला ह्याचे कारण तो फक्त वैद ह्या युग्मजाणिवेत वावरत होता. क्षत्रिय व ब्राह्मण जाणिवेकडे त्याने साफ दुर्लक्ष केले परिणामी ह्या जाणिवांनी सर्व व्यवस्था बिनधोक ताब्यात घेतली. त्याची दुसरी चूक दलित व वैश्य जाणिवेचे कामगार वैश्य जाणिवेतील मांडवलदाराशी तडजोड करू शकतील हे त्याच्या लक्ष्यात आले नाही. रशियात तर ब्राह्मण जाणिवांनी मार्क्सलाच प्रेषित व दास कॅपीटललाच ईश्वरी ग्रंथ करून व्यवस्थित पुरोहितगिरी केली.

ह्या सर्व विवेचनातून महत्वाचा प्रश्न निर्माण होतो तो असा की टीकास्वयंवरमधल्या नेमाडे यांची जाणीव कोणती ? ह्या प्रश्नांचे उत्तर वैक्ष अशी आहे मात्र नेमाडेंचा कल क्षत्रिय जाणिवेकडे आहे.

जातीव्यवस्थेकडे पाहण्याचा नेमाडेंचा जो दृष्टिकोन आहे तो ही गोष्ट निर्विवादपणे सिद्ध करतो. नेमाडेंचा एकंदर विचारसरणीत क्षत्रिय जाणीव प्रधान असल्याने नेमाडे जातीव्यवस्थेच्या विरोधात नाहीत ह्या संदर्भातील त्यांची भूमिका पान ३०४ वर त्यांनी पुढीलप्रमाणे मांडली आहे. ती वाचताना नेमाडे मराठ्यांचे नवीन राज्य तर स्थापन करायला निघालेले नाहीत ना ? अशी शंका येते. नेमाडे म्हणतात,

*"आपण जातीव्यवस्थेऐवजी जातीयता हा शब्द वापरला असता तर बरं झालं असतं. जातीव्यवस्थेच्या मी विरुद्ध नाही परंतु जातीयतेच्या मी विरुद्ध आहे. जातीव्यवस्था आपल्या देशात राहील. जातीव्यवस्थेशिवाय हिंदुस्थानातील अगणित समूहांची व्यवस्था टिकेल असे मला वाटत नाही. आपल्या अफाट जनसमुदायात धार्मिक, वांशिक, भाषिक इत्यादी अनेक सुक्ष्मतिसूक्ष्म* Mating Groups *बेटी व्यवहार करणारे समूह आपापली अस्मिता टिकवून स्वायत्त रीतीने जगत आले आहेत. त्यांच्यात परस्परांचा आदर करण्याची मुलभूत तत्व आहेत ह्या आपोआप तयार झालेल्या आडव्या परस्परसमान रचनेला मी जातीव्यवस्था म्हणतो. परंतु या समूहांची उभी श्रेणीव्यवस्था लावण्याचे प्रयत्न कट्टर हिंदुत्ववादी पूर्वीपासून करत आलेले आहेत असे प्रयत्न म्हणजे जातीयता आपण जास्तीत जास्त कठोर प्रहार कशावर*

करायला पाहिजे तर तो जातीयतेवर! मराठवाड्यातील लोकांनी जातीयतेबद्दल बोलणे नवीन काही वर्तमानपत्राचा, संस्थांच्या, राजकीय प्रणालीच्या आडून शिताफीने हे जातीयतेचे विष आपल्यात पसरवलं जातं. महाराष्ट्रात तेराव्या शतकापासून सर्वच विचारवंतांनी जातीयतेवर प्रहार केलेला आहेच परंतु तो अधिक खोलवर करणं आवश्यक झालं आहे. विशेषतः जातीयतेच्या उंचसखलपणानुसार तो बदलत जाईल.''

नेमाडे यांची ही भूमिका खोलवर जाऊन तपासणे आवश्यक आहे. कारण नेमाडेंनी भारतीय समाजाचे पान ८० वर वर्णन करताना त्याच्या दोन व्यवस्थांकडे लक्ष दिले आहे. एक जातीव्यवस्था आणि दुसरी देशव्यवस्था. नेमाडेंच्या दोन व्यवस्थांपैकी ही एक महत्वाची व्यवस्था असल्याने साहित्यातील देशीयतेच्या भूमिकेबाबतची नैतिक जाणीव तिच्यावर मोठ्या प्रमाणावर अवलंबून असणार हे उघड आहे.

जातीव्यवस्थेचा विचार नेमाडेंनी त्यांच्या पुस्तकात सतत मांडलाय खरा पण त्याचा पुरेसा खोल विचार त्यांनी केलेला आहे असे दिसत नाही. नेमाडेंचे निष्कर्ष तपासायचे असतील तर आपणाला मात्र सखोल चर्चा करावी लागेल. जागेअभावी केवळ मुख्य मुद्यांचीच चर्चा आपणाला करावी लागेल मी इथे जे सिद्धांतन करतोय त्याला जातीव्यवस्थेची Theory of Knowledge असे म्हणता येईल. हा सिद्धांत पुरेशा सामग्रीसह सिद्ध करणे इथे शक्य नाही. भविष्यात ह्यावर एक स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याचा माझा मानस आहे. हा सिद्धांत जुना आहे की नवा हे तज्ञ लोक ठरवतील.

समाजात नेहमीच ज्ञानाचे चार स्तर अस्तित्वात असतात.

१) **अमूर्त अप्रत्यक्ष** : ह्या ज्ञानाला प्रत्यक्ष प्रमाण नसते. त्यामुळेच अनेकदा शब्दप्रामाण्याचा इथे आधार घेतला जातो. हे ज्ञान मानवापेक्षा श्रेष्ठ अशा ईश्वर, शून्य, देव, देवता, चैतन्य, आत्मा, परमात्मा, स्वर्ग, नरक, देवदूत, मृत्युदूत वगैरे गोष्टींविषयी असते. ह्यातूनच आदिम ब्राह्मण जाणीव किंवा किताबी (हा शब्द इस्लाम परंपरेतला आहे) ब्राह्मणी जाणीव निर्माण होते. ही नेहमीच अनंत, निराकार वगैरे गोष्टींविषयी बोलत असते हिला वहन करणारे हे मानवापेक्षा नेहमी श्रेष्ठ मानले जातात हिला आधुनिक भाषेत स्पिरीच्युअल इंजिनअरींग असे मी म्हणतो. ह्याचा तंत्रज्ञानातून यज्ञ, उपासना, पूजा-अर्चा वगैरे गोष्टी जन्मतात.

२) **समूर्त अप्रत्यक्ष** : ह्या ज्ञानाला प्रत्यक्ष प्रमाण नसते. मात्र अनुमानात्मक प्रमाणाचा इथे आधार घेतला जातो हे प्रामुख्याने 'मन', 'बुद्धी', बुद्ध प्रेषित ईश्वरी अवतार मानले जाणारे राजे वगैरे गोष्टींविषयी असते. हे अनंताने धारण केलेल्या सांत पण इतरांना अगोचर आणि त्या व्यक्तिला मात्र गोचर अशा गोष्टींविषयी बोलते. त्याला मी आधुनिक परिभाषेत ह्युमन इंजिनिअरींग असे म्हणतो. ह्याच्यातून क्षत्रिय जाणीव जन्मते आणि क्षत्रिय जाणिवेतून हे जन्मते. हिचे तंत्रज्ञानात्मक स्वरूप, कायदा, नीती शासन इत्यादी स्वरूपात असते.

३) **अमूर्त प्रत्यक्ष** : ह्या ज्ञानाला प्रत्यक्ष प्रमाण असते. हे प्रत्यक्ष जगात कृतीद्वारे सिद्ध होते. हे प्रामुख्याने मानवी शरीर, मानवेत्तर शरीर, प्राणीसृष्टी, वनस्पतीसृष्टी व इतर जे जे अस्तित्वात आहे त्याविषयी असते हे प्रत्यक्ष गोचर गोष्टींविषयी बोलत असते आणि स्वतःची गोचर क्षमता सतत वाढवत राहते. उदा. दुर्बिण हा डोळ्यांच्या गोचर क्षमतेचा

विकास आहे. मात्र डोळ्याखेरीज दुर्बिणीला अर्थ उरत नाही हे व्यक्तिला आणि इतरांनाही गोचर असलेल्या गोष्टीविषयी बोलते. ह्याला मी मटेरीयॅलिस्टीक इंजिनिअरींग म्हणतो. ह्यातून जगातली सर्व आधुनिक विज्ञाने, तंत्रशास्त्रे, तंत्रज्ञाने, उपकरणे जन्मली आहेत. ह्याच्यातून वैश्य जाणीव जन्मते आणि वैश्य जाणिवेतून हे जन्मते (ह्या दोन्ही क्रिया परस्परानुगामी आहेत. वरील दोन्ही प्रकारातही त्या तशाच आहेत हे लक्षात ठेवावे)

**समूर्त प्रत्यक्ष :** हे ज्ञानाला प्रत्यक्ष प्रमाणच नव्हे तर ते प्रत्यक्ष असते ते प्रत्यक्ष कृती असते हे मानव, मानवेतर जड जे जे अस्तित्वात आहे त्याविषयी असते हे प्रत्यक्ष गोचर कृती असते. ॲप्लाईड इंजिनिअरींग म्हणतो ह्यातून दलित जाणीव जन्मते आणि दलित जाणिवेतून हे जन्मते.

सर्वसाधारणपणे मानवी इतिहासाच्या सुरुवातीच्या कालखंडात

१) पशुपालक संस्कृती
२) कृषीनिष्ठ स्थिर संस्कृती
३) कृषीनिष्ठ भटकी संस्कृती
४) अन्न गोळा करून जगणारी संस्कृती

अशा चार संस्कृती अस्तित्वात होत्या. ह्याशिवाय मासे मारणे, शिकार करणे हेही प्रमुख व्यवसाय अस्तित्वात होते. वरील चारही जाणीवा व चारही ज्ञानाचे प्रकार कमी जास्त प्रमाणात प्रत्येक टोळीत अस्तित्वात होते.

भारतात सिंधु संस्कृती ही प्रामुख्याने कृषीनिष्ठ स्थिर संस्कृती होती. वैश्य जाणिवेचा प्रचंड प्रभाव तिच्यावर असावा. मूलतः व्यापार करणारी ही संस्कृती कृषीही करत असल्याने संपन्न होती. भारतात इतर संस्कृत्याही ह्यावेळी अस्तित्वात होत्या पण सिंधु संस्कृती ही खऱ्या अर्थाने एक विशाल पट असलेली संस्कृती होती कदाचित अथेन्सप्रमाणे तिथे लोकशाही असेलही. ह्याबाबत काहीच विधान करता येत नाही पण ज्याअर्थी त्यांची शस्त्रे विकसीत नव्हती (ज्यामुळे ती आर्यांच्या पशुपालक संस्कृतीपुढे पराभूत झाली) त्याअर्थी ती स्पार्टन नव्हती. कृषी व व्यापार नीट असल्याने आणि पाण्याची उपलब्धता असल्याने ती संपन्न असावी. आर्यांची क्षत्रिय व ब्राह्मण जाणिवेने भारलेली पशुपालक संस्कृती व अनार्यांची क्षत्रिय, वैश्य व दलित जाणिवेने भारलेली संस्कृती यांच्यातील या संघर्षात आक्रमक आर्यांनी त्यांना पराभूत केले. ज्ञानाच्या बाबतीत सिंधु संस्कृती ही सरस होती. त्यांची नगररचना ह्याची साक्ष देते. पशुपालक आर्यांच्या दृष्टिने अमूर्त अप्रत्यक्ष ज्ञान हे सरस होते. कारण जगातल्या सर्व घडामोडी ते केवळ ब्राह्मण जाणिवेतून बघत होते. त्यांना लागणारा पाऊस व प्रजोत्पादन ह्या अमूर्त, अप्रत्यक्ष गोष्टीवर अवलंबून आहे हा त्यांचा विश्वास होता. तसेच नवीन भूप्रदेश पादाक्रांत करत जाणे ही त्यांची गरज होती. विजय मिळवून देणाराही देव असल्याने भूप्रदेश जिंकणे हेही देवांच्या हाती होते. साहजिकच अमूर्त अप्रत्यक्ष ज्ञान हे सरस ठरले. त्यानंतर समूर्त अप्रत्यक्ष ज्ञान सरस ठरले. आर्यांना मूलतः सुरुवातीला शेतीचा अत्यंत तिटकाराच असल्याने पराजित सिंधुवासीयांचे अमूर्त प्रत्यक्ष ज्ञान व समूर्त प्रत्यक्ष ज्ञान हे त्यांच्यादृष्टिने अत्यंत दुय्यम दर्जाचे बनले. ज्ञानाची उभा अक्ष दर्शविणारी एक श्रेणीच तयार झाली (जगात जवळ जवळ सर्वत्रच हा प्रकार घडला) ह्या श्रेणीत सर्वश्रेष्ठ जेते असलेल्या आर्यांचे अमूर्त अप्रत्यक्ष ज्ञान सर्वश्रेष्ठ ठरले. त्याखालोखाल समूर्त अप्रत्यक्ष ज्ञान सरस ठरले. त्याखालोखाल अमूर्त प्रत्यक्ष ज्ञान सरस ठरले व सर्वात शेवटी क्रमांक लागला तो समूर्त प्रत्यक्ष ज्ञानाचा ! मानवात पहिल्यापासूनच अमूर्त प्रत्यक्ष व समूर्त प्रत्यक्ष ज्ञानाच्या आधारे जे काम करणारे लोक होते. त्यांना अमूर्त अप्रत्यक्ष अप्रत्यक्षवाल्या लोकांपेक्षा खालच्या दर्जाचे मानले गेले. रथ घडवणाऱ्या सुताराच्या सुतारज्ञानापेक्षा तथाकथित पाऊस पाडणारे भगत किंवा ब्राह्मणाचे मंत्र महत्वाचे

ठरते. घरची कामे ही तर ह्या तळच्या दोन ज्ञानाच्या आधारेच केली जातात त्यामुळे त्यांना तर सर्वात खालचे स्थान मिळाले. आजदेखील खोली सुंदर रितीने झाडून साफ करणे हे रिलेटीव्हीटी शिकवण्याइतके महत्वाचे आहे. ह्यावर आम्हा लोकांचा विश्वास नाही. घरच्या कामाचे ज्ञान हे असे शेवटच्या दर्जाचे मानले गेल्यानेच स्त्री ही शुद्र मानली गेली. ब्राह्मण जातीत जन्मलेली स्त्रीही आपल्या ज्ञानाकडे बघण्याचा दृष्टिकोनामुळेच शुद्र बनलेली दिसते ज्यावेळेला आदिम समाजात ब्राह्मण जाणीव व अमूर्त सप्रत्यक्ष ज्ञान हे पुरुषप्रधान झाले (विशेषतः किताबी ब्राह्मण जाणीव ही तर पूर्णतः पुरुषप्रधान जाणीव आहे) तेव्हापासून पितृसत्ताक पद्धत अस्तित्वात आली आणि स्त्रीचे समाजातले स्थान तेव्हापासून अधिकाधिक दुय्यम बनत गेले. काही आदिम समाजात अमूर्त प्रत्यक्ष ज्ञान व समूर्त प्रत्यक्ष ज्ञान हे स्त्रियांच्या हातात होते व ते स्त्रीकडून स्त्रीकडे संक्रमित होत असे सध्या समाजावर स्त्रियांचेच वर्चस्व असल्याचे दिसते. ह्या सर्व प्रक्रियेत ढोर फाडण्याचे ज्ञान किंवा पायताण तयार करण्याचे ज्ञान हे सर्वात दुय्यम बनत गेले आणि त्यातूनच अस्पृश्यता निर्माण झाली. ह्याला जोड मिळाली ती अनार्यांच्या श्रमण संस्कृतीतील पुनर्जन्म व कर्मफलसिद्धांताची ! आर्यांनी अनार्यांचा हा सिद्धांत पुरेपूर वापरला व अनार्यांतील ब्राह्मण क्षत्रियांनी त्याना साथ दिली. जगभरच ब्राह्मण आणि क्षत्रिय जाणीव हातात हात घालून वाटचाल करताना दिसते. त्यामुळेच जातीव्यवस्था ही अनुवांशिक बनली आणि वैश्य (ह्यांना झळ कमी पोहचली) शुद्र व अस्पृश्य ह्या तिन्ही वर्णांना ब्राह्मण क्षत्रिय जाणिवेचे कायमचे दास्यत्व पत्करण्याची वेळ आली. महावीर ह्या वैश्य जाणिवेच्या तर बुद्ध ह्या दलित जाणिवेच्या व्यक्तिंनी ह्याविरूद्ध बंड केले खरे पण अमूर्त प्रत्यक्ष ज्ञानाचा डाटा व माहिती त्यावेळी कमी असल्याने त्यांची ही बंडे हवेत विरून गेली. कारण पाऊस का पडतो ? सारख्या मूलभूत प्रश्नांचे चुकीचे का होईना पण 'देव पाडतो' हे उत्तर ब्राह्मण जाणिवेकडे होते असे कोणतेही उत्तर बुद्ध वा महावीराकडे नसल्यानेच ही बंडे अयशस्वी झाली. कारण तत्कालिन लोकांचे समाधान करणारी उत्तरे ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेने दिली. परिणामी बौद्ध, जैन इत्यादी सर्व धर्म ब्राह्मणी जाणिवेच्या ताब्यात गेले. आजही स्त्रीमुक्तीसाठी मांडणारी स्त्री आपल्या घरातील भांडी घासणाऱ्या बाईला जी वागणूक देते ती ह्या जातीव्यवस्थेतील ज्ञानाच्या स्तरीय रचना नीट न कळल्यामुळे हे सहज इथे लक्षात येईल. जमिनीतून पीक का उगवते ? पाऊस का पडतो ? जग केव्हा निर्माण झाले ? ह्या कुणालाही पडणाऱ्या प्रश्नांची चुकीची का होईना पण ब्राह्मण जाणिवेकडे उत्तरे असल्याने आणि तत्कालीन वैश्य जाणिवेकडे ती नसल्यानेच ब्राह्मण जाणिव आपले श्रेष्ठत्व सिद्ध करू शकली. अन्यथा ती केव्हाच दुय्यम बनून गेली असती (आजही ब्राह्मण जाणिवेचे तत्वज्ञ शब्दांचा कीस पाडण्यात गढून गेलेले आहेतच. तत्वज्ञान म्हणजे भाषेचा अभ्यास असे म्हणण्याइतपत शब्दप्रामाण्य आज उंच झालेले दिसते. प्रत्यक्ष जीवनात मात्र ह्या ब्राह्मण जाणिवेचे महत्व कमी होत चाललंय. ह्यांच्या तथाकथित भाषा तत्वज्ञानाला प्रत्यक्ष जगात व जगण्यात महत्वाचे स्थान ठरलेले नाही. अर्थात मला इथे त्यांचे महत्व कमी लेखायचे नाही पण त्याबाबतची वस्तुस्थिती मात्र सांगावीशी वाटते.)

जातीव्यवस्थेत कार्यरत असलेल्या ज्ञानाची ही प्रक्रिया व स्तरीकरण तपासले की उपजाती का निर्माण झाल्या ते सहज लक्षात येते. उपजातीच्या निर्मितीमागे अनेकदा एखाद्या तंत्रज्ञानात्मक तपशीलातला फरक कार्यरत दिसतो. ह्यालाच नंतर अनेक गोष्टींची अपघातांची जोड दिसते. वरील विवेचनावरून जातीव्यवस्था ही एक विशिष्ट वर्गाने निर्माण केलेली मानवानिर्मित अशी व्यवस्था आहे हे स्पष्ट होईल.

ह्या जातीव्यवस्थेच्या सर्वात मोठा फायदा ब्राह्मणांना

व जवळ जवळ त्यांच्या बरोबरीने क्षत्रियांना मिळालेला दिसतो. आजही आपल्या जातीतील मुली इतर जातीत द्यायला नकार देणारा वर्ग मराठा आहे. एकीकडे ब्राह्मण जातीतून ब्राह्मण जाणीव नाहिशी होत असताना मराठा वर्ग मात्र अद्याप आपली क्षत्रिय जाणीव सोडायला तयार नाही. आजही ह्या देशात राजकीय सत्तेला जे कमालीचे महत्त्व आहे, त्यामागे क्षत्रिय जाणीव कार्यरत आहे. ह्या लोकांचा समाजवाद हा एका अर्थाने येऊ घातलेल्या वैश्य जाणिवेला ताब्यात ठेवण्याचा क्षत्रिय जाणिवेचा शेवटचा प्रयत्न होता. त्यामागे कसलीही दलित जाणिवेविषयी आस्था नव्हती. त्यामुळे त्याचे अपयश अटळ होते. नामांतराला ह्या लोकांनी विरोध केला ह्याचे त्यामुळे आश्चर्य मानण्याचे काहीच कारण नव्हते. नेमाडे हेही ह्या क्षत्रिय जाणिवेच्या संस्कारात वाढल्यानेच त्यांनी जातीयतेला विरोध केला आहे, जातीव्यवस्थेला नाही.

त्यांच्या एकेका विधानाचा आता ह्या पार्श्वभूमीवर विचार करू. त्यांनी जातीव्यवस्थेपासून जातीयता वेगळी काढली आहे. हे म्हणजे शरीर यंत्रणेपासून शरीर वेगळे काढण्यातला प्रकार आहे. जातीव्यवस्था आहे म्हणूनच जातीयता आहे. जातीव्यवस्थेशिवाय हिंदूस्थानातील अगणित समूहांची व्यवस्था टिकेल असे त्यांना वाटत नाही. जणू काही जातीयता माणसाच्या पोटातून आल्याच्या थाटात नेमाडे इथे बोलत आहेत. जातीयता एक मानवी व्यवस्था आहे आणि कोणतीही मानवी व्यवस्था काही कारणांनी टिकत असते. ही कारणे नष्ट झाली की मानवी व्यवस्थाही नाहीशी होते. जातीजातीत लग्ने करणे हे जातीव्यवस्था टिकण्याचे मोठे कारण असले तरी मुळातच महाविद्यालयातून जातीजातीत जे अभिसरण सुरू झाले आहे ते हळूहळू बेटी बंदी तोडेल हे स्पष्टच दिसते आहे. रोटीबंदी तर आता संपतच आलीय. हळूहळू ह्या सगळ्या बन्द्या तुटणे ही अपरिहार्य प्रक्रिया आहे. कारण मूळातच जातीव्यवस्था ज्या आधारे उभी होती १) जन्मानुसार ज्ञान व्यवसायिक ज्ञान त्यानुसार व्यवसाय, २) रोटीबंदी, ३) ग्रामीण अर्थव्यवस्था (बलूतेदार पद्धत) ह्या सर्व गोष्टी भारतीय समाजातून हळूहळू नाश पावण्याच्या मार्गावर आहेत. तेव्हा जातीव्यवस्था टिकेल ह्या नेमाडेंच्या मताला फारसा अर्थ नाही. नेमाडे जातीव्यवस्थेची उभी श्रेणी व्यवस्था नाकारतात, आडवी स्वीकारतात. कुठल्याही गोष्टीची केवळ रूंदी स्वीकारायची आणि उंची नाकारायची हे मूळातच शक्य नसते. तरीही नेमाडेंच्या मताप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व दलित समाज श्रेणीव्यवस्थेतून मुक्त झाले आणि सर्वांनी सर्व वर्ग समान अशी भूमिका स्वीकारली तरी आडव्या श्रेणीत जन्मानुसार व्यवसाय ही गोष्ट तशीच राहते. नेमाडेंच्या ह्या कल्पनेप्रमाणे बाबासाहेब आंबेडकरांनी शिक्षण करायलाच नको. नेमाडेंना हे अभिप्रेत असेल तर त्यांच्या वैचारिक दिवाळखोरीला तोड नाही असे म्हणावे लागेल पण नेमाडेंना हे अभिप्रेत नसेल अशी मी आशा व्यक्त करतो कदाचित जन्मजात व्यवसाय त्यांना नाकारायचा असेल (प्रत्यक्षात संपूर्ण पुस्तकात त्यांनी कुठेही असे म्हटलेले नाही) पण जन्मजात व्यवसाय व श्रेणीव्यवस्था नाकारली तर जातीव्यवस्थेत उरतेच काय ? जातीव्यवस्था ही केवळ विवाहमंडळाची जंत्री होईल. आता ही विवाहमंडळे तरी नेमाडेंना टिकावीत असे का वाटते ? शास्त्रीयदृष्ट्या त्यांच्याकडे ह्यासाठी काही आधार असेल. असे वाटत नाही ही केवळ सामाजिक सोय म्हणून नेमाडेंना पहायची असेल तर हा मोठा विनोद आहे एवढेच मी म्हणेन. नेमाडेंच्या पिढीने आपल्या आई-बापांना विचारून जातीतच लग्न केले असेल पण झपाट्याने बदलत चाललेल्या परिस्थितीचा वेग बघता एकविसाव्या शतकात मुले, मुली परस्परच ठरवून लग्न करतील हे उघड दिसते. नेमाडे क्षत्रिय जाणिवेत वाढल्यामुळे व वैश्य जाणिवेचा आवाका त्यांच्या लक्षात न आल्याने कसे गफलत करतात ? त्याचे हे एक उदाहरण आहे. नेमाडे जे श्रेय इथल्या वारकरी संप्रदायाला देतात ते मात्र अत्यंत चुकीचे आहे.

जातीव्यवस्था ही मूलतः ज्ञानाच्या रचनेमुळे (उतरंडीमुळे) अवतरली. ह्यातील जे ब्राह्मण जाणिवेचे अध्यात्मिक ज्ञान होते त्यावरच वारकऱ्यांनी प्रहार केले. पण ब्राह्मण जाणिवेने क्षत्रिय, वैश्य जाणिवांचा केलेला वापर व ज्ञानाची उतरंड दर्शविणारी रचना ह्याबाबतीत त्यांचे प्रतिकार शून्य होते. ब्राह्मण जाणिवेबाबत काही मूलभूत काम वारकरी संप्रदायाने केले असे म्हणवत नाही. विष्णूच्या जागी विठ्ठल आला म्हणजे फार काही परिवर्तन होत नाही किंवा टाळ कुटून अभंग म्हटले म्हणजे समाजव्यवस्था बदलत नाही. नेमाडेंचा वारकऱ्यांबाबत काहीतरी घोटाळा आहे एवढे निश्चित. भक्तीसंप्रदायाने सर्वांना आध्यात्मिक स्वातंत्र्य मिळवून दिले असेल पण ती काही फार महत्वाची बाब नव्हे. उपाशी पोटी अध्यात्म सामर्थ्यातला हा प्रकार आहे. तो तुकारामाला पेलला असेल पण सामान्य माणसाचे काय ? त्याच्यासाठी ब्राह्मणी जाणिवेचा वरवंटा तसाच राहिला. स्मृती तशाच राहिल्या. कायदे तेच राहिले. तेव्हा महानुभव वारकरी पंथाबाबत ह्या संदर्भात तरी फार बोलावे असे मला वाटत नाही. कळीचा मुद्दा इतकाच नेमाडेंच्या देशीयतेचा जातीव्यवस्था हा जो आधार आहे तो नष्ट होत जाणे अटळ आहे. भविष्यात काही काळ ती राजकीय दबाव गट म्हणून काम करेल असे वाटते.



# देशीवादांच्या उदयाची कारणे : पार्श्वभूमी

## प्रकरण दुसरे

देशीवादाचा विचार करताना जाणवणारी सर्वात विचित्र गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे महाराष्ट्रात देशीवादाचा उदय ही मूळातच उशीरा घडलेली घटना आहे. खरंतर १८५७ च्या बंडानंतर ह्या घटनेने जन्म घ्यायला हवा होता आणि १९४७ पर्यंत ही घटना संपायला हवी होती पण सर्वच प्रबोधनात्मक घटना मग त्या आर्थिक असो किंवा सामाजिक असो उशीरा करण्याचा आपला देशी स्वभाव असल्याने हीही घटना घडायला तब्बल १९६० साल उजडावे लागले. ह्या उशीर होण्यामागचे कारण शोधले तर स्पष्टपणे एकच गोष्ट दिसते ती म्हणजे ब्राह्मण जाणीव. ह्या ब्राह्मण जाणिवेचा पगडा असल्यानेच हा उशीर झाला. एकीकडे वैश्य जाणिवेत नुकताच प्रवेश केलेले इंग्रज आणि दुसरीकडे ब्राह्मण जाणिवेत अडकलेले भारतीय असा विषम सामना असल्याने ह्या लढ्यात इंग्रज विजयी झाले. ह्यात आश्चर्य करावे असे काहीच नव्हते. ह्या दोघाच्यात तब्बल एका जाणिवेचे अंतर होते. ती जाणीव म्हणजे क्षत्रिय जाणीव होय. भारतात जर आणखी दहा अकबर किंवा शिवाजी निर्माण झाले असते तर ही जाणीव निश्चितच निर्माण झाली असती पण निर्माण झाले ते ब्राह्मण जाणिवेने पछाडलेले पेशवे आणि औरंगजेब (पहिला बाजीराव हा सन्माननीय अपवाद) परिणाम व्हायचा तोच झाला. अकबर आणि शिवाजीच्या ह्या साऱ्या प्रयत्नावर त्यांच्या नंतरच्या करंट्या लोकांनी अक्षरशः बोळा फिरवला. त्यातच शिवाजी काय किंवा अकबर काय दोघांच्याही क्षत्रिय जाणिवेत उत्पादन व्यवस्था जातीशी निगडीत ठेवणाऱ्या इथल्या करंट्या अर्थव्यवस्थेने व्यवस्थित पाचर मारून ठेवल्याने दोघांनाही आपली नाळ अजिबातच वैश्य जाणिवेशी जोडून घेता आली नाही. हे दोघे एवढे शहाणे मुत्सद्दी लोक पण दोघांच्यापुढे जेव्हा छापले गेलेले बायबल आले तेव्हा दोघांनाही हे बायबल कसे काय छापले गेले असा प्रश्न काही युरोपियांना विचारावासा वाटला नाही. मग प्रत्यक्ष छापखाना ही भानगड काय आहे हे विचारणे आणि तो भारतात टाकणे हा भाग तर स्वप्नवतच होता (पुन्हा आसपास नेमाडे चित्रेंचे मौखिक परंपरा जतन करणारे पूर्वज महाभाग होतेच. अभंग पाठ होत असतील तर छापायचेच कशाला ? काय ?) आता अशा ह्या तब्बल एका जाणिवेचं अंतर असणाऱ्या दोन समाजात काय होणार ? ब्राह्मण जाणिवेतले ब्राह्मण वैश्य जाणिवेतल्या ब्राह्मणांकडून मोडकीतोडकी अशी वैश्य जाणीव शिकणार ? प्रत्यक्षात तेच झाले. पिढ्यान पिढ्या शब्दप्रामाण्य मानणाऱ्यांना नवीन वैश्य ग्रंथ मिळाले त्यांनी पुन्हा एकदा ह्या नवीन देवाच्या नावाने आंघोळी करायला सुरुवात केली. ही नवीन ब्राह्मण्यके होती. आयती मिळाली. पूर्वीही कधी पूर्वजांच्या ज्ञानाविषयी शंका घेतली नाही. शुभंकरोती म्हणून ते ज्ञान घडाघडा पाठ केले. प्रत्यक्ष व्यवहाराशी आयुष्यात कधी संबंध नव्हता आताही काही नवीन वस्तुस्थितीशी संबंध ठेवण्याची गरज नव्हती कारण मायबाप सरकारला वसाहतवाद मॅनेज करण्यासाठी काही कारकुंड्यांची गरज होती. ह्यांना कुटुंब चालवायला आवश्यक तेवढी दक्षिणा हवी होती. साररव्याला वारके भेटले आणि दोघेही पुनीत झाले. बरं जातीच्या नावाखाली ९६ टक्क्यांना आधीच शिकण्याचा अधिकार नाकारला होता ज्यांना मराठी धड येत नव्हती ते इंग्रजी शिकून मेकॉलेसाहेबाच्या कोटात शिरायला आणखी पन्नास वर्षे तरी लावणार हे उघड होते. कारकुनीशिवायच्या फावल्या वेळात करमणूक व्हावी म्हणून मायबाप सरकारने इंग्रजी कवी साहित्यिक शिकवले होतेच.

त्यामुळे काय असं उरलंच काय ? फारतर तिकडच्या कविता उचलायच्या आणि इकडे मराठीत क्रांतीकारक वगैरे कवी व्हायचं ते काम कुंट्यापासून केशवसुतांपर्यंत सर्वांनी इतनामाने केलं. ह्या सगळ्या भानगडीत देशीवाद बापडा कुठं गेला काही पत्ता लागला नाही. क्षत्रिय जाणीव आस्तेकदम आली पण लिहिणाऱ्यांना तिचा पत्ता नव्हता. कारण पुस्तकातून पुस्तकाकडे प्रवास करण्यात हयात घालवल्याने ती काही अनुभवाच्या कक्षेत येणे शक्य नव्हतं. बंगालीत मात्र बंकिमचंद्र, रवींद्रनाथ व शरदबाबू तीघांनीही ही क्षत्रिय जाणीव अचूक आपल्या कक्षेत आणली आणि बोल बोल म्हणता बंगाली साहित्य केंद्रस्थानी आणून ठेवले.

ह्या सगळ्या घडामोडी घडत असतानाच हळूहळू ब्राह्मणेतर वर्ग शिकू लागला आणि जे ब्राह्मणांना करता येणे शक्य झाले नाही ते काम हळूहळू ह्या वर्गाने हाती घेतले. १९६० नंतर जो देशीवाद उदयास आला. ह्यामागे हा वर्ग प्रामुख्याने कार्यरत होता.

## देशीवादाच्या उदयाची कारणे

**धार्मिक कारणे :**

१) इंग्रज येण्यापूर्वी भारतात ब्राह्मण जाणीव हीच केंद्रस्थानी होती. जातीव्यवस्थेमुळे हे केंद्रीय स्थान जन्मजात मिळत असे. आतापर्यंतचे सर्व ग्रांथिक ज्ञान– भारतीय संस्कृती ही ब्राह्मण जाणिवेच्या प्रभावाखाली असल्याने ब्राह्मणवर्गाची मक्तेदारी बनली. भक्तीचळवळीने ह्याला छेद दिला तरी तो प्रत्यक्ष व्यवहारात ब्राह्मण वरच राहिला. इंग्रजांच्या आगमनामुळे ज्ञानाची ब्राह्मणवर्गाकडं असलेली मक्तेदारी संपुष्टात आली. १९२० नंतर भारतीय नेतृत्व हे टिळक ह्या ब्राह्म जाणिवेकडून गांधी ह्या वैश्य घरात जन्मलेल्या वैश्य जाणिवेच्या नेत्याकडे गेले. परिणामी संपूर्ण भारतात बहुजनसमाज हा कॉंग्रेसच्या झेंड्याखाली जमू लागला. म. फुले, शाहू महाराज, शिंदे, आंबेडकर वगैरे अनेक ब्राह्मणेतरांनी बहुजनसमाजाला सत्व दिले. पंजाबराव देशमुख, यादवराव पाटील, शिंदे, बापूजी संकपाळ वगैरे अनेक नेत्यांनी शैक्षणिक संस्था काढून बहुजनसमाजापर्यंत शिक्षण नेले आणि ह्या शिक्षणसंस्थातून आलेला एक नवाच सुशिक्षित बहुजनसमाज वर्ग फोफावला. ह्यांनी आपली सर्व परंपरा बहुजनसमाजाच्या संदर्भात तपासायला सुरुवात केली. (नेमाडेंनीही आपले नाते कुठल्याही ब्राह्मणी ग्रंथांशी जोडणे जाणिवपूर्वक टाळलेले दिसते. ज्ञानेश्वरांसारख्या मराठीतील एकमेव बीजकवीचा उल्लेख केवळ ऐतिहासिक दृष्ट्या अपरिहार्य म्हणूनच केलेला दिसतो) ह्या बहुजनवर्गाने भक्तीचळवळ ही नेहमीच ब्राह्मणी जाणिवेच्या विरोधात पहिली आणि त्यातूनच आपली नाळ ह्या वारकरी संप्रदायाशी जोडणे अपरिहार्य झाले. देशीवादाला पूरक अशी ही घटना ठरली कारण देशीवाद हा मूलतः युरोपियन लोकांच्या वसाहतवादी आक्रमक वैश्य जाणिवेला प्रतिक्रिया म्हणून निर्माण होतो. मात्र युरोपियन विचारवंत दाखवतात त्याप्रमाणे देशीवादाला केवळ वसाहतवादाविरोधी लढावे लागत नाही. तर त्या त्या देशातील ब्राह्मण जाणिवेच्या चौकटीविरुद्धही लढावे लागते. युरोपियन आऊटसायडर्स असल्याने त्यांना देशीवादाची केवळ वसाहतविरोधी प्रतिक्रिया दिसली. भारत किंवा इतर देशातील विचारवंतांनी मात्र देशीवादाचा विचार करताना त्या त्या देशातील आदिम ब्राह्मण जाणीव (ही आदिवासी किंवा तत्सम गटात अधिक आढळते) किंवा किताबी (ज्यांना धर्मग्रंथ आहे) ब्राह्मणी जाणीव यांच्या विरोधी लढाव्या लागणाऱ्या लढ्यांचाही अभ्यास करणे आवश्यक आहे. अन्यथा त्यांचे देशीवादाचे आकलन तोकडेच राहिल. थोडक्यात देशीवादाच्या तीन प्रेरणा आपल्याला खालीलप्रमाणे सांगता येतील.

१) युरोपिअनाच्या वसाहतवादी वैश्य जाणिवेविरुद्ध लढणे.

२) ज्या ब्राह्मणी जाणिवेमुळे आपल्याला युरोपियनांच्यापुढे हार पत्करावी लागली त्या ब्राह्मणी जाणिवेतून देशी समाज मुक्त करणे.

३) ब्राह्मणी जाणिवेला पर्याय म्हणून प्रथम क्षत्रिय जाणीव निर्माण करणे आणि ह्या क्षत्रिय जाणिवेला लोकशाहीचे वळण देऊन संपूर्ण समाज वैश्य जाणिवेपर्यंत आणून सोडणे.

दुर्दैवाने नेमाडे यांचा देशीवाद हा युरोपियन विचारवंताच्या चौकटीत निर्माण झाल्याने त्यांनी देशीवादाचे स्वरूप केवळ वसाहतविरोधी आकृतीबंधात पाहिले आहे. त्यांना ब्राह्मणी जाणिवेविरुद्ध लढणे भाग आहे हे कळलेले आहे. पण देशीवादासंदर्भात ह्या लढ्याला तात्विक चौकटीत बसवणे जमलेले दिसत नाही. वैश्य जाणीव मात्र त्यांना नीट कळलेली दिसत नाही. कारण वैश्य जाणीव इथल्या कम्युनिस्टांच्या प्रचाराला पडलेल्या इतर भारतीय विचारवंताच्याप्रमाणे त्यांनी केवळ वसाहतवाद व साम्राज्यवाद ह्याच संदर्भात पाहिली आहे. ह्यांचा थोडासा विचार पुढे येईलच.

२) संस्कृत ही ब्राह्मणांची भाषा ठरल्याने संस्कृतेतर पैशाची वगैरे भाषांकडे अधिक लक्ष गेले. त्यातील वाङ्मयात काहींना संस्कृतपेक्षा अधिक ताजेपणा आढळला आणि त्याची मुळे आपल्या आधुनिकतेशी जोडून घ्यावीशी वाटू लागली.

३) पेशवाईच्या काळात प्रभावी ठरलेल्या ब्राह्मण जाणिवेविरुद्ध राजाराम मोहन रॉयपासून फुले, आगरकर, आंबेडकरांच्यापर्यंत सर्वांनीच आवाज उठवला त्यामुळे क्षत्रिय जाणिवेचा मार्ग मोकळा झाला. इंग्रजी शिक्षणात पारंपारिक ब्राह्मण जाणीव नसल्याने जी वैचारिक पोकळी निर्माण झाली तिने क्षत्रिय जाणिवेला जागा रिकामी करून दिली. फुले आणि आगरकर यांनी अनुक्रमे ब्राह्मणेतर चळवळ व उदारमतवादी वैश्य जाणिवेच्या ब्राह्मणांना तात्विक बळ पुरवले आणि त्यातून महाराष्ट्रातील वैश्य जाणिवेचे उत्तम भरणपोषण झाले. नवसुशिक्षित वर्गाचे भरण पोषण यांनी केल्याने त्यांच्यावर ह्याचा खोल संस्कार उमटला.

## शैक्षणिक व कलासंस्कृतीतील कारणे

१) ब्राह्मणेतरांच्या अनेक शैक्षणिक संस्थातून तयार झालेला ब्राह्मणेतर वर्गाला मराठी साहित्यात आपले चित्र आढळेना तेव्हा त्याने ह्या ब्राह्मणी साहित्याविरुद्ध बंड म्हणून आपण ज्या देशातून आलो त्या देशाकडे लक्ष द्यावयास सुरवात केली.

२) महानुभव साहित्य, संतसाहित्य, बखरसाहित्य ह्या पिढीला प्रथमच मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झाले. त्यातून मराठी गद्याचा मोठा साक्षात्कार झाला हे मराठी ग्रंथ देशी अवकाशाचे अतिशय खोल भान ठेवून असल्याचे दिसून आले. त्यामुळे देशाविषयीचा आकलनआवाका वाढला व आत्मविश्वासही बळावला.

३) नवा लेवा पाटलांचा व मराठा कुणब्यांचा समाज राजकारणात मोठ्या प्रमाणावर सत्तेवर आला. ह्याच वर्गातील काहींनी कलाक्षेत्रात प्रवेश केला. ह्यांचे संस्कार वेगळे होते. केवळ पुस्तकात वाढलेल्या ब्राह्मण जाणिवेशी प्रत्यक्ष देशात वाढलेल्या ह्यांच्या क्षत्रिय जाणिवेचे जमणे शक्यच नव्हते. त्यामुळे ग्रामीण शाळातून शिकून आलेल्या वर्गांना देशी तपशीलाला महत्व द्यायला सुरवात केली त्यातून आनंद यादव वगैरेंनी उत्तम साहित्य दिले.

४) नवसाहित्याने वास्तववादी दृष्टी दिली मात्र ती ब्राह्मण जाणिवेच्या मर्यादेत वावरत होती. क्षत्रिय जाणिवेच्या संस्कारात वाढलेल्या नेमाडे सारख्यांना ती क्षत्रिय जाणीव विकसीत करायला उपयुक्त होती किंबहुना भूमीनिष्ठ वास्तववाद त्यांनाच शक्य होता.

५) सत्यकथेची सृजनशीलता संपली त्यांचा रोमॅण्टीसिझम आणि ब्राह्मण जाणिवेशी नातं सांगणारी आकृतीवादी समीक्षा आपल्या मर्यादा स्वतःच्या वाङ्मय दृष्टीतून आणि निवडीतून सिद्ध करू लागली. सत्यकथेचे अपयश तिच्या देशी अवकाशाच्या तपशीलाच्या अभावात आहे हे उघड झाले.

६) पुणे सांस्कृतिक केंद्र म्हणून दुय्यम बनले. कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती वगैरे केंद्रे उदयाला आली. त्यांनी पुण्याच्या ब्राह्मणी जाणिवेला छेद द्यायला सुरवात केली. नेमाडे जर पुण्यात जन्मते व पुण्यात प्राध्यापकी करत राहते तर त्यांना देशीवाद सुचला असता असे वाटत नाही. मुंबई हे कॉस्मापॉलिटीन शहर साहित्याचे महत्वाचे केंद्र बनले. ह्या शहरातल्या लोकांना स्वतःचे मराठी पण इतरांचे गुजरातीपण, पारशीपण हे जास्त जाणवते. त्यामुळेच संस्कृतीतील देशी तपशील ह्यांना अधिक जाणवतो. ह्या लेखकांनी साहजिकच ह्या वेगळेपणावर भर दिला.

७) काही क्षत्रिय जाणिवेत वाढलेले लोक प्रथमच परदेशात गेले आणि त्यांना तीव्रतेने स्वतःच्या भारतीयत्वाची जाणीव होऊ लागली. त्या लोकांना जगण्याची अपिरहार्यता म्हणून स्वतःची मुळे खोल न्यावी लागली आणि त्यांच्या हाती देशीयता लागली. उदा. नेमाडेंचे लंडन वास्तव्य.

८) बाबासाहेबांसारखा महापुरुष जन्मला त्याने अस्पृश्यतेची समस्या ही पूर्णपणे देशी असल्याचे ठामपणे सांगितले. त्यातूनच देशी दलित साहित्याचा मोठा प्रवाह निर्माण झाला. बाबासाहेब हे महाराष्ट्रातील पहिले वैश्य जाणिवेचे पुजारी - त्यांच्या ठायी क्षवैद, (वैश्य, दलित व क्षत्रिय) हे जाणिवत्रय संक्रीत झाले होते. त्यापासून प्रेरणा घेऊन अस्पृश्यतेचे देशी चित्रण सुरू झाले. नवीन सवलती मिळून शिक्षण मिळालेल्या दलित वर्गाने हे कार्य तातडीने हाती घेतले.

९) पेपरबॅक क्रांतीने मुंबईच्या फुटपाथावर इंग्रजी भाषेतील पण ब्रिटीश संस्कृतीपेक्षा वेगळ्या संस्कृतीत जन्मलेली जगभरची क्लासिक्स रस्त्यावर स्वस्तात उपलब्ध करून दिली परिणामी विद्यार्थीदशेतल्या पण साहित्यिक होऊ घातलेल्या लोकांनी फ्रेंच, स्पॅनीश, रशीयन भाषेतले साहित्य वाचले. परिणामी प्रत्येक साहित्यावर असलेला अवकाशाच्या तपशीलांचा परिणाम त्यांना तत्वणी जाणवला आणि सत्यकथेतल्या साहित्याची ह्याबाबतीतली दिवाळखोरीही त्यांना स्पष्ट कळली. मर्ढेकरांच्या ब्रिटीश संस्कृतीतून जन्मलेल्या आकृतीवादाची मर्यादा त्यांना स्पष्ट जाणवली ह्या मुलांनीच नंतर लघुपत्रिकातून सत्यकथाविरोधी बंड उभे केले.

१०) ग्रामीण भागातून आलेल्या कलावंतांना मुळातच देशी भाषा, देशी संस्कार, देशी शैलीचा चांगलाच गंध होता. त्यांना मराठी साहित्यात हा गंध कुठे आढळेना. त्यामुळे त्यांना एकाचवेळी हा अविष्कार व समर्थन करणे आवश्यक बनले.

११) वाङ्मयीन इतिहासातला ब्राह्मणीपणा जाणवू लागला आणि इतिहासाचे पुनर्लेखन करणे आवश्यक वाटू लागले. परिणाम ज्ञानेश्वर रामदासांऐवजी तुकाराम नामदेव केंद्रस्थानी येणे गरजेचे बनले. खांडेकरांचे मोठ्या लोकांसाठी लिहिलेले बालवाङ्मय व फडक्यांचे कुमारांसाठी लिहिलेले पौगंड वाङ्मय ह्यांचा मर्मभेद करून साने, माटे, चि. वि. जोशी, केतकर हे केंद्रस्थानी आणणे गरजेचे बनले. नंतरच्या काळातही जी. ए. कुलकर्ण्यांनी लिहिलेला 'मोठ्या लोकांसाठी चांदोबा' लोकप्रिय होत असल्याचे पाहून ही गरज आणखीनच तीव्र बनली.

१२) ह्याच काळात मानवशास्त्र आणि लोकसंस्कृती (लोकसाहित्य) यांचा सूक्ष्म अभ्यास सुरू झाला. त्यांनी संस्कृतीतील तपशीलांचा देशीपणा अधिकच तीव्रतेने ठसवायला सुरवात केली आणि कलाक्षेत्रात त्याचा प्रत्यक्ष प्रभाव हळूहळू पडायला लागला.

१३) भारतात हळूहळू वैज्ञानिक दृष्टीकोन रूजू लागला. विचारवंत व कलावंत ह्यांनी वैज्ञानिक दृष्टिकोन स्वीकारला त्यामुळे साहजिकच वास्तववादाचा स्वीकार अटळ बनला आणि देशी वास्तवाकडे ह्या वास्तववादाने नीट पहावयाला शिकवले.

१४) फ्राईड, युग, वगैरे मानसशास्त्रज्ञांची व मानसशास्त्राची एक वैचारिक दादागिरी संपूर्ण युरोपावर चालू होती. पण

१९५० नंतरच्या मानसशास्त्रज्ञांनी व समाजशास्त्रज्ञांनी ही दादागिरी संतुष्यात आणली. मानसशास्त्रज्ञांनाही इतर समाजशास्त्रांचा आधार घ्यावा लागेल हे उघड झाले. त्याने व्यक्तिवादी मनोविश्लेषणाला छेद दिला. त्यामुळे जगभरच एका नव्या वास्तववादाची किंवा अस्तित्ववादी वास्तववादाची उभारणी झाली. त्याचा प्रभाव नवीन पिढीवर पडला.

१५) साहित्यातला अवकाश व काळ ह्या संकल्पना जाणवल्या खऱ्या पण मराठी साहित्यिकांना त्याची पुरेशी जाणीव नव्हती. नवीन पिढीने ही जाणीव देशाशी जोडून घेतली आणि ह्यातूनच पुढे नेमाडेंची देशीयतेची संकल्पना जन्मली.

१६) साहित्याच्या नेमक्या भूमिकेचा नेमाडे सारख्या लेखकांना लागलेला शोध हे देशीयतेचे सर्वात मोठे कारण आहे. नेमाडे हे एक असे लेखक आहेत ज्यांनी ऐतिहासिक विकासाला प्रमाण मानून स्वतःच्या प्रतिभेचे पंख जाणिवपूर्वक छाटले. नेमाडेंचे हे कार्य किती थोर आहे हे भविष्यातल्या पिढ्यांना कळायला कदाचित आणखी दोन दशके लागतील. 'मी स्वतः श्रेष्ठ कादंबरी लिहू शकलो नाही तरी भविष्यात अशी कादंबरी निर्माण व्हावी एवढा बंदोबस्त मी करून ठेवणार आहे'. ह्या नेमाडे यांच्या प्रतिपादनामागे एक आदिलेखक ठामपणे उभा आहे. काही महापुरुष आपले आयुष्य पणाला लावतात. त्यासाठी सर्वस्व बळी देतात. नेमाडेंनी जणू आपला रोल अचूक ओळखून कोसलामधल्या 'आंतरराष्ट्रीय' नेमाडेंचा स्वखुशीने बळी दिला आहे. नेमाडेंचे हे बलिदान पाहताना एकाचवेळी हळहळ वाटते तसेच डोळ्यात अश्रू उभे राहतात. आपल्या मागासलेल्या वाङ्मयीन संस्कृतीसाठी स्वतःतला आंतरराष्ट्रीय क्षमता असलेला लेखक मुद्दाम मारणे आणि तिचा विकास व्हावा म्हणून स्वतःच साठ मैल पुढे असतानाही मुद्दाम तीस मैल मागे येणे ही सोपी गोष्ट नव्हे. ह्यासाठी व्यक्तिमत्वात प्रामाणिक व तळमळीची सामाजिक बांधिलकी हवी. नेमाडेंनी ह्याबाबत नेमके कोणते कार्य केले हे कळण्यासाठी युरोपियन कादंबरीचा इतिहास पहायला हवा.

आदिम वैश्य जाणीव ही मुळातच एक भटकी जमात आहे. आजही सर्वत्र भटकणाऱ्या भटक्या जमाती ह्या कृषीनिष्ठ लोकांना काहीतरी विकून आपले पोट भरतात (जगात ज्या काही दुःखद गोष्टी आहेत त्यातील एक म्हणजे आधुनिक वैश्यजाणिवेच्या भांडवलदारांना आपल्याच ह्या पूर्वज जाणिवांचा विसर पडलेला आहे. खरंतर त्यांनीच आता आपल्या ह्या पूर्वजांना कृतज्ञतेने मदत करायला हवी) तिला ब्राह्मण जाणिवेत आणि क्षत्रिय जाणिवेत दुय्यम स्थान होते. शेक्सपिअरचे "मर्चन्ट ऑफ व्हेनिस" हे तत्कालिन वैश्याकडे समाजाकडे पाहण्याचा दृष्टिकोन व्यक्त करते. आपल्याकडे मात्र जैन धर्म हा पूर्णपणे वैश्य धर्म असल्याने (तो धर्म स्वीकारून तत्कालीन वैश्यांनी समकालीन ब्राह्मण जाणिवेविरुद्ध बंड केले. आजही सर्व जैन व्यापारी आहेत. त्याचे कारण ते मुळातच वैश्य आहेत. बौद्ध धर्मानेही ब्राह्मण जाणिवेविरुद्ध बंड केल्याने ह्या धर्माकडेही मोठ्या प्रमाणात वैश्य खेचले गेले. त्यामुळे बौद्ध आणि जैन वाङ्मयात वैश्यांचे चित्रण आस्थेने केले गेलेले दिसते. (भारतातील आर्य - अनार्य संघर्ष म्हणजे भटकी वैब्राक्ष जाणीव विरुद्ध स्थिर आदिम कृषीनिष्ठ वैश्यदलित जाणीव यांच्यातला संघर्ष होय. इथे श्रमण संस्कृती ब्राह्मण संस्कृतीकडून पराभूत झाली.) युरोपमध्ये ही वैश्य जाणीव वाढीस लागणे क्षत्रिय जाणिवेला ब्राह्मण जाणिवेविरुद्ध लढण्यासाठी आवश्यक होते. त्यातूनच व्यापारी जहाजे जगभर घुमू लागली. वैश्य जाणिवेने भारावलेले धाडसी दर्यावर्दी नवीन नवीन भूमींचा शोध घेण्यासाठी जगभर घुमू लागले. त्यांची ही एका माहित नसलेल्या जगात भटकंती करण्याची जीवनशैली प्रथम अविष्कृत झाली ती कादंबरीरूपात. कादंबरी हा मूलतः वैश्य जाणिवेने जन्माला घातलेला व वाढवलेला प्रकार आहे.

सर्वान्तिसच्या डॉन क्विझोटमध्ये पहिला वैश्य नायक अवतरला. वैश्य जाणिवेला आयुष्यात नेहमीच ईश्वरी निश्चिततेला नाकारून मानवी संदिग्धतेला तोंड द्यावे लागते. अनिश्चितता हा तिचा स्वाभीमान असतो तर सर्वांशी शक्यतो तडजोड करत जगण्याचा तिचा स्वभाव असतो. (भारतातील जैन धर्मावर वैश्य जाणिवेचा सर्वाधिक पगडा आहे आणि जगात शास्त्रशुद्धपणे धर्माची मांडणी करणारा जैन धर्म ईश्वर फार पूर्वीच नाकारून बसलाय. बर्ट्रांण्ड रसेलच्या Why I am not christian ह्या ग्रंथातले ईश्वर नाकारणारे युक्तिवाद जैन त्याच्यापूर्वीच हजारो वर्षे करून बसलेत. बुद्धाने असे युक्तिवाद केलेले नाहीत मात्र त्यानेही ईश्वर नाकारला कारण त्याच्या जाणिवेत वैश्य जाणिवही कार्यरत होती) ह्या वैश्य जाणिवेतला मानवी बनत नव्या प्रदेशातील स्थानिक लोकांच्या सर्व चालीरीतींचे बारकाईने निरीक्षण करावे लागते. वेगवेगळ्या स्तरातील लोकांशी संबंध ठेवावे लागतात त्यांना सांभाळावे लागते (आज भारतात विशेषतः महाराष्ट्रात वैश्य जाणिवेचे सर्वात खंदे समर्थक जातीने ब्राह्मण असणारे लोक आहेत. त्यांनी वैश्यापेक्षा अधिक गतीने वैश्य जाणीव आत्मसात केलेली दिसते. परिणामी सर्व धंदे व उद्योग ब्राह्मण जातीच्या हातात सरकताना दिसतात) डॉन क्विझोट मध्ये वैश्य जाणिवेची संदिग्ध विश्वविषयी जिज्ञासा बाळगत ज्ञान गोळा करत जगण्याची वृती दिसते. 'रॉबिन्सन क्रुसो'मध्ये एकाकी असलेल्या वैश्य जाणिवेने जगाशी जुळवून घेण्यासाठी केलेला संघर्ष आहे. ह्यात रॉबिन्सन क्रुसो आणि वस्तू यांचा जो संबंध आहे तो पार्थिव आहे. कारण मुळात वैश्य जाणिवेला ब्राह्मण जाणिवेसारखं स्वर्गस्थ शक्तीवर पूर्ण अवलंबून राहून चालत नाही तर जे जग जसे आहे तसेच स्वीकारावे लागते (त्यामुळे विज्ञानाचा पुरस्कार आणि प्रचार वैश्य जाणिवेला अटळ ठरतो) ह्यानंतरचा युरोपचा महत्वाचा कादंबरीकार होता बाल्झाक. याने वैश्य जाणिवेने जी आधुनिक मांडवलशाही उभी केली तिच्या सामाजिक संस्थापासून ते कायदा सुव्यवस्थेपर्यंतचे सर्व तपशील बारकाईने चित्रीत केले. वैश्य जाणिवेने जगात ज्या काही गोष्टी केल्या त्यात एक महत्वाची गोष्ट म्हणजे यंत्राचा शोध लावून माणसाला फावला वेळ निर्माण केला. व्यक्तिवाद हे तर वैश्य जाणिवेचे मुख्य वैशिष्ट्य. मादाम बोव्हरीला मिळालेला फावला वेळ वैश्य जाणिवेचा व्यक्तिवाद आणि तिने निर्माण केलेला भोवतालच्या वस्तूंचा ढीग यातूनच पुढे फ्लॉबर्टने दैनंदिन जीवनातला तोचतोचपणा, कंटाळवाणेपणा आणि वेळेची पोकळी भरून काढण्यासाठी त्या पोकळीत भोवतालच्या वस्तूंची स्वप्नात केलेली पुनर्रचना असा एक विचित्र खेळ मांडून वैश्य जाणिवेची आधुनिक शोकात्मिका निर्माण केली. (वैश्य जाणिवेतील गुजराती केतन मेहतांनाच माडाम बोव्हारीवर "माया मेमसाब" काढावासा वाटला ह्यात आश्चर्यजवळ काहीच नव्हते. मात्र भारतातील वैश्य जाणीव ही मूलतः अध्यात्मप्रवण असल्याने त्यांना फ्रेंच मादामला 'माया' जोडावीशी वाटली. त्यांच्या प्रत्येक फ्रेममधून त्या फ्रेमच्या ग्राफीक्समधून व तपशीलातून मादामबरोबर माया व्यक्त झालेली दिसते असो) यानंतर मात्र वैश्य जाणिवेने निर्माण केलेली व्यवस्था आक्रमक टोटॅलिटरीयन क्षत्रिय जाणिवेने ताब्यात घेतली. (ही प्रेरणा मार्क्सच्या दलित जाणिवेनेच दिली) आणि वैश्य जाणिवेचा संस्थात्मक पसारा आणि ढिगारा नुसताच वाढत गेला तर त्या भाराखाली व्यक्तिचे काय होते ह्याचा आविष्कार काफकाने केला. वैश्य जाणिवेने निर्माण केलेली मोठी मोठी ऑफिसेस बॉस ते प्यून पर्यंतचे स्तर त्यातून संपूर्ण आयुष्यालाच आलेली व्यस्तता व असंगतता ह्या साऱ्याचा आविष्कार काफका व पुढे काम्युने केला.

नेमाडे जेव्हा कादंबरी लिहायला बसले तेव्हा भारतात वरील असे जाणिवत्रय सर्वच पातळ्यावर काम करत होते. ह्यातील क्षत्रिय जाणिवेचे देशाला स्वातंत्र्य मिळवून देणे हे मोठे काम पूर्ण झाले होते आणि वैश्य जाणिवेला राष्ट्राच्या

उभारणीसाठी कंबर कसावी लागली होती. म्हणजे भारतीय समाजाची संवेदनशीलता ही बाल्झाकच्या विश्वाला समांतर होती पण संपूर्ण जग मात्र काफ्काच्या संवेदनशीलतेच्या छत्राखाली वावरत होते. नेमाडे यांनी बाल्झाक टॉलस्टाय डोस्टोव्हस्कीची संवेदनशीलता आणि काफ्काची संवेदेनशीलता संकरीत केली आणि ह्यातूनच कोसलासारखी जगातली एक थोर कादंबरी निर्माण केली. बाल्झाक गद्याच्या पूर्वावतार त्यांना महानुभव गद्यात फार पूर्वीच सापडला होता. आधुनिक युरोपियन कादंबऱ्यात त्यांना काफ्का सापडला ह्यामुळेच कोसलातला अनुभव हा एकाचवेळी व्यक्तिनिष्ठ आणि समाजनिष्ठ असा बनला मात्र मूलतः क्षत्रिय संस्कारात वाढ झाल्याने 'पिता' हा राजाच्या भूमिकेत वावरत होता आणि 'मनी' ही प्रजेच्या रुपात वावरत होती. पांडुरंग सांगवीकर हा वंशाचा दिवा वगैरे असणारा राजपुत्र होता. वैश्य जाणिवेच्या संस्कारामुळे क्षत्रिय जाणिवेतली मंपकगिरी उघडपणे जाणवत होती. त्यामुळे कोसलामध्ये कादंबरीभर वैश्य जाणिवेचा राजपुत्र आपल्या क्षत्रिय जाणिवेच्या व्यवस्थेविरुद्ध, कुटुंबाविरुद्ध लढताना दिसतो. हा राजपुत्र ब्राह्मण जाणीव कशी काय सहन करणार ? त्यामुळे कादंबरीत पुण्याची वारंवार टर उडवलेली दिसते. वैश्य जाणिवेने फावला वेळ निर्माण केला आणि जगण्यासाठी आवश्यक पैसा आयता पुरवला की असली बंडे सुचतात ही बंडे अनेकदा मादाम बोवरीसारखी स्वप्नाळू किंवा पुस्तकी असतात. नेमाडेंचा जेव्हा आयत्या पैशाचा काळ संपला तेव्हा साहजिकच त्यांना वस्तुनिष्ठ व्हावे लागले आणि केवळ पुस्तकातच आपण अशी उडी मारलीय. प्रत्यक्षात भारतीय समाज बाल्झाकसमांतर आहे हे त्यांच्या लक्षात आले आणि मग सहाजिकच समाजाचे वस्तुनिष्ठ चित्रण करणारी बाल्झाक शैली त्यांना भारतीय संवेदनशीलता व्यक्त करण्यासाठी योग्य वाटू लागली. मराठी कादंबरीकारांना युरोपियन लोकांच्या संपन्न वैश्य समाजातून येणाऱ्या समस्या भारतात जन्मण्याआधीच चित्रित करण्याची घाई झालेली असताना (ह्यात खानोलकरांसारख्या अडाणी माणसांनी ह्या वैश्य जाणिवेचा संकर आदिम ब्राह्मण जाणिवेशी घालून मराठी कादंबरीत चांगलाच गोंधळ घालायला सुरुवात केली. ब्राह्मण जातीच्या छत्रछायेखाली वाढलेल्या पण वैचारिक पातळीवर वैश्य बनलेल्या ब्राह्मणाला अगदी आतला आवाजच जणू सापडला. मग काय ? सत्यकथेतून ह्या नव्या अडाणी संप्रदायाचे पीकच आले) नेमाडेंनी मात्र स्वतःची प्रतिमा प्रचंड ताकदीची असूनही स्वतःची कादंबरी वास्तवसमांतर केली आणि इतरांनाही भारतातील प्रखर वास्तवतेचे भान यावे म्हणून देशीवादाचा जोमदार पुरस्कार करायला सुरुवात केली. नेमाडे यांच्या देशीवादामागचे सर्वात मोठे कारण समाजाचा व नेमाडेंचा हा जाणीव विकास आहे. (नेमाडेंच्या देशीवादाची चर्चा करतानाही समीक्षकांना किती आंतरराष्ट्रीय फेऱ्या माराव्या लागतात हे एव्हाना वाचकांच्या लक्षात आले असेलच. ह्यावरून नेमाडेंचा महाराष्ट्री असावे हा आग्रह किती चुकीचा आहे, हेही लक्षात येईल)

## राजकीय कारणे

१) १९४७ नंतर भारत स्वतंत्र झाला आणि नेहरूयुग सुरु झाले. नेहरू हे एकाचवेळी युरोपच्या वैश्य जाणिवेने आणि रशियाच्या दलित जाणिवेने (जी अत्यंत विकृत स्वरूपात अस्तित्वात होती हे नंतर जगाच्या लक्षात आले) भारावले गेले होते. क्षत्रिय जाणिवेचा पूर्ण विकास करण्याआधीच नेहरूंनी घेतलेली उडी भारताला चांगलीच महागात पडली. (आजसुद्धा भारतातील मुसलमानांचा प्रश्न हा मूलतः ब्राह्मण जाणिवेत अडकलेल्या आणि क्षत्रिय वैश्य जाणिवेत यायला पूर्ण नकार देणाऱ्या संस्कृतीचा प्रश्न आहे हे भल्या भल्या विचारवंतांच्या लक्षात आलेले नाही) नेहरूंच्या आंतरराष्ट्रीय राजकारणातला फोलपणा हळूहळू कळू लागला होता. नेहरूंचा हा आंतरराष्ट्रीय सोस इतका वाढला होता की, माओ त्से तुंगनाही "भारत हा

युरोप अमेरिकेचा भाग नसून आशियाचा भाग आहे हे नेहरू विसरलेले दिसतात'' असे उद्‌गार काढावे लागले. (माओ त्से तुंग प्रत्यक्षात नेहरूंइतके स्वप्नाळू होते. नेहरूंना क्षत्रिय जाणिवेचा विसर पडला होता तर माओंना वैश्य जाणिवेचा. त्यांना आपला देश क्षत्रिय जाणिवेतून एकदम दलित जाणिवेत आणून ठेवायचा होता. परिणामी स्वप्नाळू आणि निर्दय हुकूमशाही त्यांनी निर्माण केली. हे सांगण्याचे कारण भारतातल्या व जगातल्या सर्वच कम्युनिस्टांना वैश्य जाणीव टाकून सरळ दलित जाणिवेत घुसायचे होते. त्यांचा ह्या घाईने जगाचा सत्यानाश केला. ह्याउलट बाबासाहेबांजवळ ह्या बाबतीत एक प्रखर वास्तववादी भान होते. दुर्दैवाने साहित्यातल्या भाबड्या रोमॅण्टिक क्रांतीकारकांना ह्या भानाचा विसर पडला आणि ते शब्दांचे फवारे उडवण्यात रमले.) नंतर चीनशी झालेल्या युद्धानंतर तर ह्या रोमॅण्टीसिझमची फोलपटे उरली. आंतरराष्ट्रीय वादावरला विश्वास उडाला आणि त्याने देशीवादाचा विचार करणे भाग पाडले.

२) ह्याच काळात नेहरूंना समांतर असे राम मनोहर लोहियांचे नेतृत्व निर्माण झाले. त्यांचा समाजवाद हा माओंप्रमाणे देशी भान ठेवणारा होता. त्यांनी देशी मूल्यांचा पुरस्कार केला. उदाहरणार्थ काळा रंग हा गोऱ्या रंगाइतकाच सुंदर असतो वगैरे. त्याचाही प्रभाव सर्वच देशीवाद्यांवर पडला.

३) नवा सत्ताधारी क्षत्रिय मराठा वर्ग सत्ताधारी बनला पेशव्यांचे राज्य जाऊन भोसल्यांचे राज्य आले. चव्हाण हे नवे शिवाजी झाले. नवीन मावळ्यांनी आपल्या पोटात हळूहळू वैश्य व दलित जाणीव सामावून घ्यायला सुरुवात केली. त्याने ग्रामीण साहित्याची जरी चळवळ उभी करायला मदत केली. मात्र क्षत्रिय जाणिवेतल्या ऐदी सरदारीचा प्रभाव बहुसंख्य मावळ्यांवर राहिल्याने त्यांनी जहागिरदाराप्रमाणे वैद जाणिवेतून आलेली सहकार चळवळ राबवली आणि तिचा सत्यानाश केला. शिवाजी सावंत, रणजीत देसाई सारख्यांनी ह्याच मावळ्यांचे प्रतिनिधित्व साहित्यात केले.

४) १९६० नंतर संपूर्ण जगात एक बिटनिक पिढी जन्माला आली आणि तिने प्रस्थापित व्यवस्थेला प्रश्न विचारायला सुरवात केली. ह्याचवेळी सार्त्रच्या कृतीवादी अस्तित्ववादाचा प्रभाव जगभर पडला. भारतातील तरूण मुले ह्या चळवळीच्या प्रभावाखाली आपोआपच आली व त्यांनी सर्वच क्षेत्रात नवीन परिवर्तनाच्या घोषणा केल्या. नवमार्क्सवादी लोकांनी ह्या चळवळीला आवश्यक ते तत्वज्ञान पुरवले. सार्त्रचा मार्क्सवादी अस्तित्वाद संपूर्ण जगातील तरूण पिढीवर एक क्षीण प्रभाव टाकून गेला.

५) महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. त्यासाठी जो लढा द्यावा लागला त्यातून महाराष्ट्रवादी भूमिका तयार होऊ लागली. तिने देशीवादाला चालना दिली. महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर तर स्पष्टपणे महाराष्ट्रीय म्हणजे काय असा प्रश्न विचारला जाऊ लागला.

६) महाराष्ट्र राज्याने पंचायत राज्य व्यवस्थेचा पुरस्कार केला. त्यानेही राज्यशासनात प्रथमच भारतीयत्व दर्शवणारी संस्था अस्तित्वात आणली त्यामुळे देशीवादाला चालना मिळाली.

## आर्थिक कारणे

१) समाजवाद ही दलित जाणिवेची आदर्श व्यवस्था जगभर स्वीकारली जाऊ लागली ह्यातून बहुजनहिताय, बहुजनसुखाय हा मुलमंत्र जपला जाऊ लागला. साहित्यातही हाच मूलमंत्र देशीवादाच्या रूपाने कार्यरत झाला.

२) जगभरच्या मार्क्सवाद्यांनी माओवाद, कॅस्ट्रोवाद असे समाजवादाचे देशी आराखडे निर्माण केल्याने मार्क्सचा

आंतरराष्ट्रीय आकृतीबंध हा फक्त आदर्शातच असतो हे सिद्ध झाले आणि समाजवाद हाही देशी तत्वज्ञान म्हणूनच काम करतो हे सिद्ध झाले.

३) आर्थिकदृष्ट्या बहुजनसमाज वधारला. त्यातून वाचकवर्ग वाढला (मात्र नेमाडे यांनी म्हटल्याप्रमाणे तो अपेक्षेइतका वाढला नाही) पण दुर्दैवाने ह्या बहुजन समाजाने आख्यानक (मी ययाती, स्वामी वगैरे ना आख्यानक कादंबऱ्या म्हणतो कारण पंडीत कवींच्या आख्यांनासारखी ह्या कादंबऱ्याची रचना आहे) कादंबऱ्यांना कवटाळायला सुरवात केली तेव्हा ह्या आख्यानक अभिरूचीला शह देण्यासाठी देशी कादंबऱ्यांची निर्मिती गरजेची बनली.

४) ग्रामीण अर्थव्यवस्था नव्याने कायापालट करू लागली. त्यातून खास गावाचे प्रश्न निर्माण झाले. त्याचे चित्रण देशीवादी दृष्टिकोनातून शक्य आहे असे कादंबरीकारांना वाटू लागले व त्यांनी तसे चित्रण केले.

## सामाजिक कारणे

वरील सर्व कारणात सामाजिक चर्चा झाली आहे. इथे फक्त काही उरलेल्या गोष्टींचा निर्देश करतो.

१) इबेटसन, नेसफिल्ड, सेनार्ट, ओल्डेनबर्ग, डालमन, हर्बर्टरिस्ले, जॅकसन, केतकर, रामप्रसाद चंदा, स्लेटर, बंट यांनी जातीव्यवस्थेची आपापल्या पद्धतीने मीमांसा पूर्वीच केली होती. ह्यानंतर घुर्ये, होकार्ट, गिल्बर्ट, हटन, इरावती कर्वे आदी लोकांनी जातीव्यवस्थेची पुन्हा नव्याने मीमांसा केली. ह्या सर्व मीमांसेने दोन गोष्टी स्पष्ट केल्या.

१) जातीव्यवस्था हे केवळ भारतीय आणि केवळ भारतीय समाजाचेच व्यवच्छेदक लक्षण आहे. ती संपूर्णतः एक देशी वस्तुस्थिती आहे.

२) भारतीय राजकारण, समाजकारण, अर्थकारण ह्या सर्वांच्या केंद्रबिंदूस्थानी जात ही अतिशय महत्वाची भूमिका बजावते आहे.

ह्या वस्तुस्थितीच्या आकलनाने एक गोष्ट स्पष्ट झाली ती म्हणजे साहित्यात समाजाचे चित्रण व्हायचे असेलतर जातीय व्यवस्था, तिचे स्तर त्यातील सर्वांचेच गुंतलेले हितसंबंध व शोषण ह्या साऱ्यांचे चित्रण करावेच लागेल. ह्या चित्रणासाठी देशीयतेचे भान ठेवावेच लागेल हे समाजशास्त्र वाचणाऱ्यांना स्पष्ट झाले. (एरव्ही कलावाद मोडणाऱ्या पुंडलिकांनीही हे भान राखलेले दिसते)

२) महाविद्यालय नावाची संस्था प्रथमच मोठ्या प्रमाणावर विस्तार पावू लागली. ह्या महाविद्यालयात प्रथमच बहुजनसमाजातील मुले व मुली मोठ्या संख्येने जमू लागली. पौगंड व तरूण वयातील व्यक्तींचे एवढ्या मोठ्या प्रमाणावर एकत्रीकरण हा भारतीय जातीव्यवस्थेला तिथे स्पर्शबंदी, रोटी बंदी, बेटी बंदी, सिंधु बंदी वगैरे सतराशे साठ बंधा होत्या. फार मोठा छेद होता. ह्या महाविद्यालयातून होणाऱ्या निवडणूका, सांस्कृतिक कार्यक्रम व प्रेमप्रकरणातून एकाच वेळी जातीयता स्पष्ट होऊ लागली आणि तिचा ऱ्हासही चालू झाला. वरील महाविद्यालयीन घडामोडीत जातीयता एक महत्वाचा हिस्सा म्हणून कार्यरत राहू लागली. ह्या महाविद्यालयातून आलेल्या वर्गाला जातीयता आणि देशीयता कुणी नव्याने समजावून सांगण्याची गरज नव्हती. सहजिकच देशीयतेसाठी वातावरण मोकळे झाले.

३) सर्वच जाती सुशिक्षित होऊ लागल्या. ह्यातून परस्पर संपर्क वाढला. त्यातून तुमच्या जातीत लग्न कसे करतात ? आमच्याकडे वरणात गूळ टाकतात तुमच्याकडे टाकतात का ? आम्ही मटणात कोल्हापूरी मसाला वापरतो. तुम्ही ? वगैरे प्रश्न विचारले जाऊ लागले. आतापर्यंत त्या त्या जातीपुरतेच असणारे हे सांस्कृतिक तपशील सर्वांनाच खुले होऊ लागले.

त्यातून साम्य आणि भेद ठळकपणे समोर येऊ लागते. ह्या प्रक्रियेचे चित्रण करताना देशीवादाशिवाय पर्याय नव्हता.

४) हिंदी व मराठी चित्रपटवाल्यांनी (कुमार गंधर्वसारख्या शास्त्रीय गायकानेही) लोकसंस्कृतीतील नाटक, संगीत व नृत्य यांचा रसरशीत आविष्कार केल्याने लोकसंस्कृतीकडे बघण्याचा ह्या पिढीचा दृष्टिकोन साफ बदलला. बालगंधर्वांनी गायलेल्या कंटाळवाण्या खोट्या लडीवाळ गाण्यापेक्षा लता, किशोर, आशा, रफींनी गायलेले एस. डी. बर्मन वगैरेंचे लोकसंगीत अधिक थोर आहे हे ह्या लोकांना कळले. त्यामुळे आपल्या देशी कलाकडे बघण्याचा दृष्टिकोन साफ बदलला. देशी तंत्राची उसनवारी करणे हे अभिमानास्पद बनते (नंतर तर ती फॅशनच बनली).

५) क्लोद लेवी स्त्रोसने म्हटल्याप्रमाणे देशी संस्कृतीचे सर्व जगभरच विघटन व्हायला सुरुवात झाली होती. भारत त्याला अपवाद नव्हता. एखादी गोष्ट मरणपंथाला जाऊ लागली की तिच्याविषयी अधिक आस्था निर्माण होणे हे मानवी स्वभावाला धरून होते. (नेमाडेंनी केलेले आदिवासींचे चित्रण) त्यामुळे ह्या विघटनाला प्रतिक्रिया म्हणूनही देशीवादाचा पुरस्कार चालू झाला.

नेमाडेंनी ही सर्व देशी कारणे लक्षात घेऊन देशीवादाची मांडणी केली असती तर आपले आकलन अधिक स्वच्छ झाले असते पण ज्ञानदा ठकूर यांनी ह्याच पुस्तकात छापलेल्या परिशिष्टात म्हटल्याप्रमाणे त्यांनी पाश्चात्य मानवशास्त्रातून उसनवारी करून आपली मांडणी केली. उदा. त्यांनी मांडलेला कादंबरीचा पट व वर्गीकरण ज्ञानदा ठकूर यांच्या मते हा क्लोद लेवी स्त्रोसकडून उसना घेतला आहे. ह्याच पर आपण देशी परंपरेत असा मांडू शकतो.

हे विश्व म्हणजे आहे किंवा जे आहे ते विश्व, हे आहे. मानवासंदर्भात त्रिस्तरीय संरचनेत अस्तित्वात असते.

१) ज्ञाता
२) ज्ञेय
३) ज्ञान

ज्ञाता आणि ज्ञेय असतात. ज्ञान ही क्रिया असते.

हे विश्व निर्भाव असते तसेच सभाव असते. असण्यालाच निर्भाव आणि सभाव ह्या दोन्ही मिती असतात. विश्वाचा मूळ सभाव हा आनंदरूप आहे. पण त्याचे असणे विविध सांत रूपात असल्याने ही सांत रूपे पुन्हा मूळ अनंतरूपाकडे आणि आनंदाकडे जाण्यासाठी धडपडतात.

विज्ञान म्हणजे ह्या विश्वाची लावलेली निर्भाव व्यवस्था होय.

कला म्हणजे ह्या विश्वाची लावलेली सभाव व्यवस्था होय.

मानवाला जगताना ह्या दोन्ही व्यवस्थांची गरज असते. विज्ञानात ज्ञाता शून्य व्हावा लागतो. तरच वैज्ञानिक ज्ञान शक्य होते. कलेमध्ये ज्ञाता समग्र व्हावा लागतो. तरच कलात्मक ज्ञान शक्य होते. दोन्ही ठिकाणी ज्ञेय समग्र रूपात कवटाळण्याची व रूपांतरीत करण्याची आकांक्षा असते.

वाङ्मय म्हणजे ज्ञात्याने भाषिक चिन्ह्यांच्याद्वारे ह्या विश्वाची लावलेली सभाव व्यवस्था होय. कादंबरीमध्ये ह्या ज्ञानाची व्याप्ती अत्यंत विस्तृत असते. तसेच ज्ञेयही ज्ञात्याकडून मोठ्या प्रमाणावर व्याप्त होते. इथे भाषिक चिन्हांचा पसारा मोठा असतो. ज्ञेयाची अनेक मानवरूपे व वस्तुरूपे इथे तपशिलवार अस्तित्वात असावी लागतात. कवितेत व कथेत मर्यादित भाषिक चिन्हांच्या सहाय्याने ज्ञेय व्याप्त करावे लागते. ज्ञाता ज्ञेयाकडे चार दृष्टिंनी पाहतो व भाषिक चिन्हांनी त्याची पुर्नरचना करते.

१) आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन
२) वास्तववादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन
३) आत्मवादी आत्मनिष्ठ दृष्टिकोन
४) वास्तववादी आत्मनिष्ठ दृष्टिकोन

आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोनात ज्ञाता स्वतःला ज्ञेयाचे जसे व जे ज्ञान होते तेच वास्तव मानतो इथे जसे दिसते तसे ज्ञेय पुनर्रचीत करण्याकडे कल असतो.

वास्तववादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोनात ज्ञाता स्वतः लोप पावून ज्ञेय जसे आहे तसे जाणण्याचा प्रयत्न करते. इथे ज्ञेय जसे आहे तसे पुनर्रचीत करण्याकडे कल असतो.

आत्मवादी आत्मनिष्ठ दृष्टिकोनात ज्ञेयाचा स्वतःला हवा तसा कायापालट घडवला जातो. हा कायापालट प्रत्यक्ष विश्वात शक्य आहे की नाही ह्याचा अजिबात विचार केला जात नाही.

वास्तववादी आत्मनिष्ठ दृष्टिकोनात विश्वात शक्य असलेला कायापालटच केला जातो.

हे चारही दृष्टिकोन कलेत संभावात्मक असतात.

ज्ञाता हा चार प्रकारचा असतो.

१) पुरुष चित्त असलेला पुरुष उदा. नेमाडे, चित्रे, डोस्टोव्हस्की, टॉलस्टाय.
२) स्त्रैण चित्त असलेला पुरुष उदा. पु. शि. रेगे, ग्रेस, डी. एच. लॉरेन्स.
३) स्त्रैण चित्त असलेली स्त्री उदा. अनुराधा पाटील, एमीली डिकन्सन, गौरी देशपांडे.
४) पुरुष चित्त असलेली स्त्री उदा. आयन रँड

वरील पार्श्वभूमीवर मराठी कवितांचा किंवा वाङ्मयाचा पट पुढीलप्रमाणे मांडता येईल.

१) महानुभवी :

ज्ञेय हे वास्तववादी वस्तुनिष्ठ पद्धतीने भाषेत रुपांतरीत करणे. इथे तपशील मोजके असतात. उदा. सत्तांतर, श्यामची आई

२) ज्ञानेश्वरी :

परमार्थेतील ज्ञेयानुभव स्वतःच्या अस्तित्वानुभवाच्या कुशीत घडवून रुपांतरीत करणे. आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन असतो. उदा. कवितातले ढसके, सात सक्कं त्रेचाळीस.

३) अनुभवामृती :

परमार्थेतील ज्ञेयानुभव हा आरंभबिंदू मानून तो ज्ञेयानुभव स्वतःच्या ज्ञेयानुभवात विरघळून स्वतःचा ज्ञेयानुभव भाषेत रुपांतरीत करणे. उदा. ॲबसर्ड साहित्यातून आलेले विलास सारंग, सदानंद रेगे व अधोलोकमधले वसंत ढसके, आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन असतो.

४) वारकरी :

पारंपारिक चालत आलेला ज्ञेयानुभव पचवून त्याचे भान राखत भोवतालच्या ज्ञेयातून आलेला ज्ञेयानुभव भाषेत रुपांतरीत करणे. उदा. कोसला, चित्रे यांच्या कविता. इथे आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन असतो.

५) एकनाथी :

ज्ञेयाविषयीच्या झालेल्या धारणा धारण करून घेतलेला ज्ञेयानुभव नवीन नवीन तंत्रे शोधून भाषेत रुपांतरीत करणे. इथे आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन असतो. उदा. करंदीकर.

६) बखर :

ज्ञेय हे वास्तववादी वस्तुनिष्ठ पद्धतीने बारीक सारीक तपशीलासह भाषेत रुपांतरीत केले जाते. उदा. बिढार, जरीला.

**७) रामदासी :**

अस्तित्वात असलेले ज्ञेय प्रत्यक्षातही बदलावे ह्या दृष्टिकोनातून भोवतालच्या ज्ञेयातून आलेला ज्ञेयानुभव भाषेत रूपांतरीत करणे. उदा. दलित कविता, सामर्थ्य आहे चळवळीचे, जो जो करील तयाचे. हा दृष्टिकोन स्वीकारून दलितांनी खुद्द रामदासांविरुद्धच व त्यांच्या तत्वज्ञानाविरुद्ध ही रामदासी शैली वापरली. वास्तववादी वस्तुनिष्ठ पद्धत सर्वसाधारणतः असते.

**८) पंडिती :**

परभाषेतील ज्ञेयानुभवासारख ज्ञेयानुभव तंत्र व शैलीची उसनवारी करून भाषेत रूपांतरीत करणे. उदा. मर्ढेकरांची पाणी, केशवसुत. आत्मवादी वस्तुनिष्ठ शैली.

**९) पंतीय :**

तंत्रच सर्वश्रेष्ठ मानून येणारा ज्ञेयानुभव जास्तीत जास्त निर्दोष तंत्राच्या सहाय्याने भाषेत रूपांतरीत करणे. उदा. ग्रेसच्या कविता किंवा रेगेंच्या कादंबऱ्या. इथे आत्मवादी आत्मनिष्ठ दृष्टिकोन असतो.

**१०) आख्यानक :**

आत्मवादी आत्मनिष्ठ दृष्टिकोनातून ज्ञेयानुभवाचा ह्वा तसा कायापालट घडवून त्याचे भाषेत केलेले रूपांतर. उदा. चि. त्र्यं. खानोलकरांच्या कादंबऱ्या.

**११) शाहिरी :**

लोकांचे मनोरंजन व प्रबोधन व्हावे म्हणून ज्ञेयानुभव लोकांना आवडेल अशा रंजक पद्धतीने रूपांतरीत करणे. उदा. आजच्या लोकप्रिय कादंबऱ्या.

ही मांडणी इतर कलांना लावून दाखवणे अशक्य नाही. फक्त इथे ती साहित्याच्या संदर्भात वापरली आहे. भाषेऐवजी त्या त्या कलांचे माध्यम इतर कलात कार्यरत असते. इतकेच मात्र प्रत्येक कलेनुरूप यात थोडे नावाचे बदल करावे लागतील.

हे सर्व मांडण्याचे कारण एवढेच की नेमाडेंच्या देशीवादातील विदेशी बाजू काढून छाटून त्याठिकाणी देशी अवताराची प्रतिष्ठापना करणे अवघड नाही हे कळावे. हे करताना मी युरोपच्या द्विध्रुवात्मकतेला जाणिवपूर्वक छेद देऊन चतुर्ध्रुवात्मक मांडणी सर्वच बाबतीत केली आहे हे सहज लक्षात येईल.

❀ ❀ ❀

नव्या पिढीतील समीक्षक श्री. श्रीधर तिळवे यांच्या 'टिकाहरण' या आगामी पुस्तकातील पहिले दोन प्रकरणे या अंकात दिली आहेत. येत्या अंकांमध्ये या पुस्तकाची पुढील प्रकरणे प्रसिद्ध करण्यात येतील. 'अभिधा'च्या अभ्यास वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया पाठवाव्यात ही विनंती. — संपादक

[redacted]

कविवर्य हेमंत गोविंद जोगळेकर यांचा बहुचर्चित आणि केशवसुत पुरस्कार विजेता कवितासंग्रह **'होड्या'** नुकताच इंग्रजीतून **'Boats'** या नावाने प्रसिद्ध झाला. 'होड्या' कवितासंग्रहातील सर्व कवितांचा इंग्रजी अनुवाद यात असून तो इंग्रजीतून काव्यलेखन करणारे सुप्रसिद्ध कवी डॉ. मकरंद परांजपे यांनी केला आहे. 'Boats' हा संग्रह दिल्लीच्या बी. आर. पब्लिशिंग कॉर्पोरेशन तर्फे 'न्यू वर्ल्ड लिटरेचर सिरीज'च्या अंतर्गत प्रकाशित झाला आहे.

[redacted]